# गोपाळ कृष्ण गोखले

## यांचें चरित्र.

# गोपाळ कृष्ण गोखले.

( चरित्र, गुण व त्यापासून बोध. )

लेखकः

गणेश रघुनाथ अभ्यंकर, बी. ए., एल् एल् बी

पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत अनंत विनायक पटवर्धन यांनीं

छापून प्रसिद्ध केलें.

१९१५.

किंमत चार आणे

# प्रकाशकाचे दोन शब्द.

रा. रा. गणेश रघुनाथ अभ्यंकर, बी. ए., एल्. एल्. बी., वकील, सांगली, यानीं प्रस्तुत प्रकाशित होत असलेलें **गोपाळ कृष्ण गोखले** यांचें त्रोटक चरित्र विविधाज्ञनविस्तार मासिकाच्या संपादकांच्या विनंतीवरून लिहिलें होतें. सदर लेख विविधज्ञानविस्ताराच्या जूनच्या अंकांत प्रसिद्ध झाल्यावर तो पुष्कळ विचारी लोकांस फारच पसंत पडला; राजकीय परिस्थितीचें इतकें उत्तम विवेचन केलेला लेख लोकांच्या हातीं पडून त्यांच्या कल्पनांस योग्य वळण लावण्याची संधि व्यर्थ दवडूं नये, अशा सूचना अनेकांकडून करण्यांत आल्या. याचसाठी स्वतंत्र पुस्तकरूपानें हा लेख आम्ही प्रसिद्ध करीत आहोंत. विविधज्ञानविस्ताराच्या मालकानीं हा लेख छापण्यास परवानगी दिल्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों. त्यांची परवानगी मिळाल्यावर सदर लेखांत कमीजास्ती करून देण्याबद्दल आम्हीं रा० अभ्यंकर यांस विनंति केली व त्याप्रमाणें त्यानीं चरित्राचा भाग थोड्या विस्तारानें दिला आहे. गोपाळराव, त्यांचे गुरु व स्नेही आणि त्यांचा संबंध असलेल्या संस्था यांचे फोटो देऊन पुस्तक जास्त उपयुक्त करण्याची खटपट केली आहे. गोपाळरावांच्या महनीय चरित्राचें रहस्य जनतेस कळावें या हेतूनें पुस्तकाची किंमत शक्य तितकी कमी ठेविली आहे. या योगानें हें पुस्तक अनेक मराठी वाचकांच्या हाती जाऊन इच्छित कार्यसिद्धि घडेल, अशी आशा आहे.

**प्रकाशक.**

# गोपाळ कृष्ण गोखले.

## चरित्र, गुण व त्यापासून बोध.

नरपतिहितकर्ता द्वेष्यताम् याति लोके ।
जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ॥
इति महति विरोधे विद्यमाने समाने ।
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥ १ ॥

## प्रास्ताविक.

नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांच्या निधनानें हिंदुस्थानांतील एक अत्यंत देदीप्यमान हिरा आज नाहींसा झाला यांत शंका नाहीं. बादशहापासून तों अगदी रंकापर्यंत प्रत्येक मनुष्यास या थोर पुरुषाच्या अकाल मृत्यूमुळें हळहळ वाटत आहे. हिंदुस्थानांतील हिंदी लोकांनीं किंबहुना जगाच्या पाठीवर ज्या ज्या ठिकाणीं म्हणून हिंदीसमाज आहेत तेथीलसुद्धां लोकांनीं, या खेदजनक प्रसंगाबद्दल विद्युतसंदेशानें, जाहिर सभांनीं, खाजगी पत्रांनीं व वर्तमानपत्रांतील लेखांनीं, आपलें दुःख प्रदर्शित केलें, व आपआपल्यापरी या महात्म्याबद्दल आपला पूज्यभाव व्यक्त केला. या दुःखप्रदर्शनांत सत्ताधारी वर्गांतील लोकही सामील झाले आहेत. अशा तऱ्हेचा सत्ताधारीवर्ग व प्रजाजन यांच्यामधील निस्सीम एकवाक्यतेचा प्रसंग, हिंदुस्थानांत आजपर्यंत कधीं अनुभवास आलेला नाहीं. सर्व ब्रिटिश साम्राज्यामध्यें आपली यशोधवल कीर्ति मागें ठेवून व सर्व वर्गाच्या व सर्व दर्जाच्या लोकांस आदरणीय होऊन कोणीही हिंदी पुढारी आजपर्यंत गेला नाहीं. गोपाळरावांच्या मृत्यूसंबंधीं साम्राज्यांत प्रगट झालेले अनेक मुत्सद्यांचे व राजकार्यधुरंधर पुरुषांचे विचार लक्षांत घेतां, गोपाळराव नुसते पुण्याचे किंवा मुंबई इलाख्याचे किंवा सर्व हिंदुस्थानचेच

मुत्सद्दी नसून सर्व साम्राज्यांतील मुत्सद्यांत त्यांची गणना होत होती असें स्पष्ट होतें. राजकीय बाबतींत गोपाळरावांशीं सदैव विरुद्ध असणाऱ्या व हिंदुस्थानच्या आकांक्षांबद्दल अनुदार वृत्ति बाळगणाऱ्या खुद्द लॉर्ड कर्झन-साहेबांनीं गोपाळरावांबद्दल फार आदराचे उद्गार काढले असून* त्यांनीं असेंही सांगितलें कीं, जगांतील कोणत्याही प्रातिनिधिक संस्थेस गोपाळराव ललामभूत झाले असते. व खुद्द इंग्लंडच्या हॉऊस ऑफ कॉमन्समध्येंही त्यांनीं उच्च प्रतीचा नांवलौकिक मिळविला असता. गोपाळरावांच्या योग्यतेबद्दल खात्री पटविणेस ही एकच गोष्ट पुरेशी आहे; याहून अन्य बलवत्तर प्रमाणाची मुळींच जरूरी नाहीं.

हिंदुस्थानांतील नागरिक या नात्यानें ब्रिटिश साम्राज्यांत सत्ताधारी वर्गानें आदरानें, पूज्यबुद्धीनें, सन्मानानें व बरोबरीनें जर कोणाचा गौरव केला असेल तर हिंदुस्थानच्या इतिहासांत गोपाळरावजींचाच होय. अशा तऱ्हेचा मान हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही पुरुषास आजपर्यंत कधीं मिळाला नाहीं. गोपाळरावांच्या चरित्राचें रहस्यही या एका विशेषांतच आहे. गोपाळ-रावांची योग्यता, त्यांची कामगिरी, त्यांना सोसाव्या लागलेल्या अडचणी, त्यांनीं संपादन केलेली यशःप्राप्ति, आपल्या हेतूंबद्दल इतरांचे ठिकाणीं त्यांनीं उत्पन्न केलेला पूज्यभाव, त्यांनीं लोकांपुढें ठेविलेलें उदात्त ध्येय, या सर्वांचें अनेक दृष्टींनीं आकलन करण्यास गोपाळरावांचें सविस्तर चरित्र प्रसिद्ध व्हावयास पाहिजे. तें होण्यास पुष्कळ अडचणी आहेत. एक तर त्यांच्या बऱ्याच कामगिरीचें स्वरूप अद्याप प्रसिद्ध झालेलें नाहीं. वरिष्ठ कायदेकौन्सिलांत आणीबाणीच्या प्रसंगीं व राजकीय अस्वस्थतेमुळें क्षुब्ध झालेल्या वातावरणांत कायद्याच्या प्रतिगामी स्वरूपास आळा घालण्याचे कामीं त्यांनीं जे अविश्रांत श्रम केले त्यांची माहिती फार थोड्या लोकांस आहे. पुष्कळ संस्था व पुष्कळ व्यक्ति यांचेवर अनपेक्षित कारणांनीं ओढवलेल्या संकटांचें निवारण करण्याचे कामीं गोपाळरावांची किती मदत झाली हें फार थोड्या व्यक्तींस

---

* "He had never met a man of any nationality more gifted with Parliamentary capacities. Mr. Gokhale would have obtained a position of distinction in any parliament in the world, even in the British House of Commons."

ठाऊक आहे. इंग्लंडांतील उदारचरित पुरुषांची सहानुभूति हिंदुस्थानच्या हिताबद्दल मिळविण्याकरितां जो खटाटोप गोपाळरावांनीं केला त्याचा इतिहास अद्याप प्रसिद्ध झालेला नाहीं. जबाबदार मंत्रिमंडळापुढें हिंदुस्थानच्या गाऱ्हाण्यांबद्दल गोपाळरावजींनीं जी वकिली केली, तिची जाणीव सामान्य जनसमूहास मुळींच नाहीं. साउथ आफ्रिकेंतील हिंदीसमाजाच्या किंवा मुदतबंदीच्या मजुरांच्या नाजूक व बिकट प्रश्नांसंबंधीं तडजोड काढण्यांत, जी मुत्सद्दगिरी, जो चाणाक्षपणा, गोपाळरावजींनीं दाखविला त्याचें यथार्थ ज्ञान अद्याप सर्व लोकास झालेलें नाहीं. मिंटो, मोर्ले यांच्या सुधारणांच्या पूर्वस्वरूपांत गोपाळरावजींच्या प्रयत्नांचा किती वांटा होता याचें रहस्य अद्याप कळावयाचें आहे. हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील पुष्कळ विद्वान् व राजकारणी पुरुषांशी त्यांचा झालेला पत्रव्यवहार अजून प्रसिद्ध व्हावयाचा आहे. ही सर्व सामग्री उपलब्ध झाल्यानंतर गोपाळरावजींचें सर्वव्यापक व बहुमोल चरित्र लिहितां येईल. हा कालावधीचा प्रश्न आहे. पुष्कळ नामांकित इंग्रजी मुत्सद्द्यांनीं गोपाळरावजींस **हिंदुस्थानचे ग्लॅडस्टन** अशी संज्ञा दिली आहे. अर्थात् गोपाळरावजींचा चरित्रलेखक कोणी तरी **मोर्ले** पुढें उत्पन्न होईल. तथापि या भावी चरित्रलेखकावर सर्व भिस्त सोंपवून स्वस्थ बसण्याचें कारण नाहीं. ग्लॅडस्टनसाहेब यांच्या चरित्राबद्दल लॉर्ड मोर्ले यांनीं काढलेले उद्गार अशा प्रसंगीं अगदीं मननीय आहेत. "कोणत्याही मुत्सद्याचें चरित्र त्याच्या निधनाबरोबर लगेच लिहावयाचें म्हणजे मोठी अडचण असते. पुष्कळ वादग्रस्त गोष्टींची आठवण ताजी असते. यामुळें उत्पन्न झालेल्या क्षुब्ध मनोवृत्तींची तीव्रता कमी झालेली नसते. तुलनेनें, समवायानें, सादृश्यानें, परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करणें कठीण असतें. पुष्कळ अप्रसिद्ध गोष्टींच्या प्रकाशनानें समकालीन पुरुषांस खेद वाटण्याचा विशेष संभव असतो. तथापि एखाद्या मुत्सद्द्याची योग्यता बरोबर जाणण्यास त्या पिढींतील लोकच जास्त लायख असतात. कारण ते एकाच परिस्थितींत वाढलेले असतात, तत्कालीन महत्त्वाच्या प्रश्नांची त्यांस माहिती असते, अडचणींची जाणीव असते, साधनांचें स्वरूप अवगत असतें व विरोध करणाऱ्या गोष्टींचें हृद्गत त्यांस आकलन करतां येतें. यासाठीं समकालीन लोकांनी केलेली मुत्सद्द्याची परीक्षा जास्त आदरणीय होय व याच दृष्टीनें गोपाळरावजींच्या चरित्रापासून काय बोध घेतां येईल, त्यांची

लोकाग्रणी या नात्यानें किती उच्च दर्ज्याची योग्यता होती याचें त्रोटक विवेचन मी यथामति करणार आहें.

गोपाळरावजींचें चरित्र म्हणजे हिंदुस्थानचा गेल्या ३० वर्षांचा राजकीय इतिहास होय. कारण त्यांच्या आयुष्यांतील बहुतेक महत्त्वाचा भाग हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय प्रश्नांशीं संलग्न झालेला आहे.

## जीवनवृत्त.

रत्नागिरी जिल्ह्यापैकीं चिपळूण तालुक्यांतील कोतळूक या गांवीं गोपाळरावजींचा जन्म ता. ९ माहे मे सन १८६६ इ. रोजीं झाला. गोपाळरावजींचे वडील कृष्णराव हे कागल संस्थानांत फौजदार होते. वयाच्या सुमारें दहा वर्षांपर्यंत गोपाळराव कागलासच होते. त्यांचा मराठी अभ्यास तेथेंच झाला. मराठी अभ्यास पुरा झाल्यानंतर गोपाळराव व त्यांचे वडील बंधु गोविंदराव यांस कोल्हापुरास इंग्रजी शिकावयास ठेविलें होतें. तेथें असतांना इ. स. १८७९ सालीं त्यांचे वडील वारले. घरची गरिबीची स्थिति व त्यांत कुटुंबाचें संगोपन करणारा कर्ता पुरुष गेल्यामुळें या उभयतां बंधूंवर मोठेंच संकट ओढवलें. त्या वेळचे कागल संस्थानचे कारभारी रावसाहेब विष्णु परशराम वैद्य यांच्या खटपटीनें गोविंदराव यांस कागल संस्थानांत कारकुनीची नोकरी मिळाली. थोडा पगार व मोठा प्रपंच अशी अडचणीची स्थिति असूनही गोविंदरावांनीं कष्ट सोसून गोपाळरावजींच्या शिक्षणास मदत केली. वडील बंधूचे हे उपकार गोपाळराव कधींही विसरले नाहीत. आमरणांत गोविंदरावजींस ते पितृतुल्य मानीत. गोविंदरावजींच्या पश्चात् त्यांच्या मोठ्या कुटुंबाचा सर्वभार गोपाळरावजींनीं आपल्या शिरावर घेतला होता व आपल्या पश्चातही त्यांनीं त्यांची चांगली व्यवस्था केली आहे. गोपाळरावजी इ. स. १८८१ सालीं राजाराम हायस्कुलांतून प्रवेश—परीक्षा पास झाले. १८८२ सालीं कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत ते होते व या सालच्या अखेरीस ते पी. ई. ची परीक्षा पास झाले. या वेळची सभोंवतालची परिस्थिति अपूर्व होती. प्रो. पटवर्धन यानीं मासिक मनोरंजनांतील आपल्या लेखांत फार बहारीनें या कालाचें वर्णन खालीं दिल्याप्रमाणें केलें आहे "सामान्यतः कोणत्याही काळीं मुलांचीं कॉलेजांतील वर्षें महत्वाचीं असतातच. पण गोपाळराव कॉलेजांत होते त्या काळीं त्या वर्षांला असामान्य स्वरूप यावयाला महाराष्ट्रांत दुसरें एक कारण उपस्थित झालें होतें. प. वा. विष्णुशास्त्री

चिपळूणकरांची लेखमाला अगोदर सात आठ वर्षे प्रसिद्ध होत असल्यामुळें महाराष्ट्रांत नवा एक पक्ष तयार होत होता. कृष्णशास्त्री चिपळूणकर, रावबहादूर गोपाळराव हरि देशमुख, रावसाहेब रानडे वगैरे मंडळींच्या उद्योगानें, व्याख्यानांनीं आणि प्रत्यक्ष चळवळीनें, जें लोकशिक्षणाचें कार्य झालें होतें त्याचेंच एक अनपेक्षित फळ शास्त्रीबुवांच्या लेखांनीं परिपक्क झालें होतें; आणि स्वतंत्र किंवा आपल्याच दृष्टीनें, हिंदुस्थानच्या स्थितीचा आणि सामाजिक, धार्मिक, राजकीय प्रश्नांचा विचार करणारा एक वर्ग तयार होत होता. सन १८७२ पासून १८८२ पर्यंत जे तरुण विद्यार्थी कॉलेजांत होते त्यांच्या मनात आपल्या देशाची अवनतस्थिति आणि त्याचें प्राचीन वैभव यांतील दारुण विरोध बाणून गेला होता. आहे तें आणि असावें तें यांतील जमीनअस्मानांतील अंतर विचार करणाऱ्या व जिवंत दृष्टीच्या तरूण मंडळीस स्पष्टपणें, कदाचित् तीक्ष्णपणें प्रतीत होत होतें. आहे तें तसेंच रहूं व चालूं दिल्यास हिंदुस्थानचें भवितव्य काय होईल याची भयंकर कल्पना त्याना दुःसह झाली होती. महाराष्ट्राच्या सर्व वातावरणांत देशाभिमानाचें वारें वाहूं लागलें होतें आणि कॉलेजांत शिकत असणारे बहुतेक विद्यार्थी त्याच्या सपाट्यांत कमी अधिक आले होते. त्यांपैकीं जे कांहीं उदार मनाचे, दिलदार बुद्धीचे, उत्कट भावनांचे आणि उदात्त कल्पनांचे तरुण होते, त्यांच्या विचारावर याचा ठसा विशेष जोरानें उठला. ते फुरसतीच्या वेळीं आपल्या लोकांचा आणि देशाच्या स्थितीचा विचार करून थांबत नसत. चालू असलेली अधोगति थांबविण्याला निदान तिचा भरधांव वेग कमी करण्याला आपण स्वतः कांहीं तरी केलें पाहिजे, असें त्यांना वाटूं लागलें. त्यांचे विचार हळू हळू दृढतर होऊं लागले. तेच तेच विचार पुनः पुनः निरनिराळ्या प्रसंगांनीं निरनिराळ्या वेळीं मनांत येऊन त्यांचीं ठाम मतें होत होतीं, झालीं होती; कांहींची मजल याहीपुढें गेली होती. सरकारी नोकरी न धरतां कांहींतरी स्वतंत्र उद्योग करावयाचा त्यांनीं निश्चय केला. कांहींनीं या साऱ्या अनर्थाचें मूळ, लोकसमाजाचें गाढ अज्ञान, असें ठरवून तें दूर करण्याचे प्रयत्न आपण करावयाचे बेत केले. इंग्रजी शिक्षणावांचून लोकांचे डोळे उघडावयाचे नाहींत, त्यांना आत्मज्ञान व आत्मप्रत्यय व्हावयाचा नाहीं, आणि देशाचा ऱ्हास थांबावयाचा नाहीं, तेव्हां "जें कांहीं आपणांस ठावें तें आपल्या बांधवांना शिकवावें, शाहणे करून सोडावे सकलजन" असे त्यांचे बेत झाले. पाश्चात्य ज्ञानाचा

प्रसार करणें हाच तरणोपाय आहे या विचारानें आपला जन्म त्या कामीं घालवावयाचा बेत करून प. वा. गोपाळराव आगरकर आणि श्रीयुत टिळक यांनी प. वा. विष्णुशास्त्री चिपळूणकर व नामजोशी यांच्या मदतीनें पुण्यास न्यू इंग्लिश स्कुलाची स्थापना केली. त्या वेळीं सरकारी नोकरी आतांप्रमाणें दुर्मिळ नव्हती. सरकारी नोकरीत शिरणें म्हणजे जन्म ऐषआरामांत घालवावयास सांपडून लक्ष्मीच्या गळ्यांतील ताईत बनणें होतें. मोठाले पगार व मोठाले अधिकार त्या वेळच्या पदवीधरांच्या मागें लागत म्हटलें तरी चालेल. हा मार्ग ऐहिक दृष्ट्या सर्वतोपरी शहाणपणाचा आणि राजमान्य, तसाच लोकमान्य, असतांही तो सोडून या मंडळीनें आपला जन्म लोकशिक्षणाला वाहण्याची शपथ घेतली आणि त्याप्रमाणें सुरुवातहा केली. शाळा काढली एवढ्यानें त्यांच्या कर्तृत्वशाली अंतःकरणांचें समाधान झालें नाहीं त्यांनीं केसरी आणि मराठा हीं पत्रें काढलीं. याप्रमाणें लोकांमध्यें विद्येचा आणि सामान्य ज्ञानाचा प्रसार झपाट्यानें करण्याचा त्यांनीं उपक्रम केला. या नव्या धाडसानें सगळें महाराष्ट्र निनादून गेलें. या मंडळीचा देशाभिमान, लोकांचीं मनें वळें ओढूं लागला. जिकडे तिकडे या लोकांबद्दल अभिमान व आदर पसरला. इतक्यांत बर्वे प्रकरण उपस्थित होऊन केसरीवर खटला झाला; आगरकर व टिळक या दोघांस शिक्षा होऊन त्यांस डोंगरीच्या तुरुंगांत १०१ दिवस काढावे लागले. न्यू इंग्लिश स्कूल, केसरी व मराठा या नवीन निघालेल्या देशाभिमानी संस्थांवर ओढवलेलें हें संकट महाराष्ट्राला आपल्यावरच ओढवल्याप्रमाणें वाटूं लागलें. सर्व महाराष्ट्र देश या तरुण देशाभिमानी वीरांचा आप्त बनला आणि त्यांच्याकरितां, त्यांना सोडविण्याकरितां, त्यांना आपला पक्ष हायकोर्टामध्यें नीट मांडतां येण्याकरितां महाराष्ट्रांत वर्गणी गोळा होऊं लागली. या खटल्याचा संबंध कोल्हापुराशीं अत्यंत निकट होता. तेथील राजघराण्यांतील पुरुषाच्या कैवारानें हे दोघे वीर संकटांत पडले होते. त्यांच्याकरितां माधवराव नामजोशी यांना वारंवार कोल्हापुरास जावें लागे. न्यू इंग्लिश स्कूल, केसरी व मराठा या संस्था चालविण्याचें काम कोल्हापूरचे श्रीयुत वामनराव आपटे यांवर पडलें. या सर्व कारणसमुदायामुळें १८८२।८३ सालीं जे महाराष्ट्रीय तरुण कोल्हापूरच्या कॉलेजांत होते त्यांचीं तीं वर्षें एका तऱ्हेनें अपूर्व होतीं. त्या वेळची लोकवृत्ति आणि वातावरण हीं वीजेनें भारलेलीं होतीं. विजेचा प्रवाह अंगांत शिरून धमन्यांतील रक्त जसें नाचूं

लागावें, तसें महाराष्ट्रानें तरुण रक्त त्या वेळीं सळसळत होतें. कोल्हापूरच्या कॉलेजांतील तरुणांवर या विजेच्या लाटेचा परिणाम फार जोराचा झाला. गोपाळराव याच मंडळींत होते. या खटल्याच्या मदतीसाठी कोल्हापूरच्या कॉलेजांतील मंडळींनी " भ्रांतिकृत् चमत्कार " हें नाटक रंगभूमीवर करून दाखविलें व त्याचें उत्पन्न खटल्याच्या मदतफंडास देऊन टाकिलें. गोपाळरावजींनीं या नाटकांत एक भूमिका घेतली होती." अभ्यासक्रम संपल्या-वर गोपाळराव पुढें १८८६ शीं सालीं डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे लाइफ मेंबर झाले त्या स्फूर्तीचा उगमही याच वेळेस झाला.

१८८३ शीच्या जानवारींत फर्स्ट बी. ए. च्या अभ्यासाकरितां गोपाळ-राव पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत गेले. राजाराम कॉलेजांत त्या वेळी हा वर्ग नव्हता. यामुळें एक सहामाही त्यांनीं पुण्यास काढिली. दुसऱ्या सहामाहीस हा वर्ग कोल्हापुरास सुरू झाला. गोपाळराव पुनः कोल्हापुरास आले व या वर्षाचे अखेरीस त्यांची फर्स्ट बी, ए ची परीक्षा पास झाली. पुढें बी. ए. च्या करितां गणित हा ऐच्छिक विषय त्यांनीं घेण्याचें ठरविलें, व त्यासाठी मुंबईला एल्फिन्स्टिन कॉलेजांत जावयाचा त्यांनीं बेत केला. त्या कॉलेजांत त्या वेळीं गणिताचे प्रोफेसर हॉर्थॉर्नथ्वेट हे प्रसिद्ध अध्यापक होते. १८८४शी सालीं गोपाळ-राव बी. ए. झाले व दुसऱ्या वर्गांत आले. एल्फिन्स्टिन कॉलेजांत असतांना प्रो. कर्वे यांचा व गोपाळरावजी यांचा स्नेह जडला. शाळेंत अथवा विश्वविद्या-लयांतून उत्तीर्ण होईपर्यंत विद्यार्थी या नात्यानें गोपाळरावजींचा अत्यंत बुद्धिमान् म्हणून कांहीं लौकिक नव्हता. परंतु साधारणतः तरतरीत बुद्धीचे व मेहनती विद्यार्थी ते होते. त्यांनीं आपली स्मरणशक्ति अतिशय वाढविली होती. त्यांच्या पाठशक्तीबद्दल, दीर्घोद्योगाबद्दल व जबर मेहेनतीबद्दल त्यांचे सहा-ध्यायी त्यांची वाखाणणी करीत. आपल्या गरीब स्थितीची जाणीव लक्षांत बाळगून आपल्या शिक्षणाचा भार आपल्या बंधूवर आहे व तो कुटुंबास कष्ट-दायक आहे किंबहुना दुःसह आहे, हें सदैव नजरेपुढें ठेऊन गोपाळरावजींनीं आपला विद्यार्थीदशेंतील काल फार मेहनतीनें घालविला. वयाच्या अठराव्या वर्षी ते बी. ए. झाले.

बी. ए. झाल्यानंतर पुढें काय करावें याचा एकदम निश्चय त्या वेळीं झाला नाहीं. इंजिनियरिंग कॉलेजांत एल. सी. ई. साठीं ते कांहीं दिवस जात असत. त्याच वेळीं विलायतेस सिव्हिल सर्व्हिसला जाण्याची त्यांची इच्छा होती व

कांहीं स्नेह्यांच्या मदतीनें त्या दिशेनें खटपटही झाली. परंतु त्या प्रयत्नास यश आलें नाही. द्रव्याच्या अभावामुळें हा विचारही लुप्तप्राय झाला. पुढें ते कायद्याचा अभ्यास करूं लागले. डेक्कन कॉलेजांत ज्युरिस प्रूडन्सचा वर्ग सुरू झाला. पुण्यांत राहून पहिली एल्. एल्. बी. पास होण्याची सोय झाली. तेव्हां पुण्यांत न्यू इंग्लिश स्कुलांत त्यांनी ३५ रुपयांवर नोकरी धरली व कायद्याचा अभ्यास सुरू केला. १८८५ शींच्या अखेरीस ते पहिली एल्. एल्. बी. पास झाले. पुढें पुण्यास राहूनच नोकरी करून ते मुंबईस दुसऱ्या एल्. एल. बी. च्या टर्मीस भरीत असत. याच वर्षी पूना हायस्कुलांतील शिक्षक देशपांडे व गोपाळराव यांनी मिळून एक पब्लिक सर्व्हिस एक्झॅमिनेशनचा वर्ग काढला, त्यांत ते आळीपाळीनें शिकवीत असत.

१८८५ शींपासून गोपाळरावजींचा न्यू इंग्लिश स्कूलशीं संबंध जडला. त्या वेळीं या संस्थेंत आगरकर, टिळक, नामजोशी, केळकर, धारप व गोळे हे सभासद झाले होते. या सुमारास या मंडळीनीं कॉलेज काढण्याचा बेत केला. आपल्या संस्थेस डेक्कन एज्युकेशन सोसायटी हें नांव देऊन ती नियमबद्ध केली. ती चिरस्थाई करण्याचा प्रयत्न केला. या संस्थेच्या चालकांना, तरुण, उत्साही, स्वार्थत्यागी, माणसांची फार जरूर होती व होतकरू व तेजस्वी असा कोणीही मनुष्य भेटल्यास ते त्याला आपल्या संस्थेंत ओढण्याचा प्रयत्न करीत. शिक्षक या नात्यानें गोपाळरावांचा व या संस्थेच्या चालकांचा निकट संबंध आला. गोपाळरावांस ते आपल्या मंडळींत सामील करण्याचा प्रयत्न करूं लागले. या मंडळींपैकीं त्या वेळीं पुढारी ह्मणजे टिळक व आगरकर असे दोघे होते. विद्यार्थिदशेंतच गोपाळरावांना या दोन व्यक्तींबद्दल आदर वाटत होता. सन्निकर्षानें व सहवासानें गोपाळराव या मंडळींत सामील झाले. न्यू इंग्लिश स्कुलांत शिक्षक राहिल्यापासून गोपाळरावजींनीं इंग्रजी भाषेंत प्राविण्य संपादण्याचा प्रयत्न नेटानें सुरू केला. सर्वोत्कृष्ट इंग्रजी ग्रंथांचें सूक्ष्म अध्ययन करून तें करतलामलकवत केलें. मिल्टनचे पॅराडाइज लास्ट, ग्लॅडस्टनचीं भाषणें, जॉन ब्राइटचीं भाषणें, बर्कचे ग्रंथ हे त्यांस मुखोद्गत येत होते. विद्यमान इंग्रजी वाङ्मयाचा त्यांचा परिचय चांगला होता. एखादी सुंदर कविता, एखादा हृद्यंगम लेख, भाषेंतील मार्मिक खोंच, वाखाणण्यासारखी वाक्यरचना, त्यांच्या वाचण्यांत आली तर ते आपल्या स्मृतिकपाटांत सांठवून ठेवीत. त्या वेळच्या ‘ मराठ्या’मध्यें केव्हां तरी ते

इंग्रजी लेख लिहीत असत. त्यांनीं लिहिलेली "जनरल वार इन यूरप" ही मराठ्य तील लेखमाला त्या वेळीं लोकप्रिय झाली होती असें म्हणतात. १८८६ शींच्या अखेरीला व १८८७ शींच्या आरंभी त्यांनीं इंग्रजी अंकगणित लिहिलें व तें पुरें झाल्यावर गणितांतील तज्ज्ञ माणसांस दाखवून त्यांनी पसंत केल्यावर तें छापविलें. हें अंकगणित फारच लोकप्रिय झालें आहे. पूर्वीचीं शाळाखात्यात प्रचलित असलेली अंकगणितें यामुळें मागें पडलीं. मॅकमिलन् आणि कंपनीनें याच्या छपाईचा हक्क घेऊन त्याचा फैलाव सर्वत्र हिंदुस्थानांत केला आहे. या अंकगणिताच्या उत्पन्नांतून गोपाळरावजींच्या प्रपंचास चांगली मदत झाली आहे. १८८७ शीं साली गोपाळरावजी फर्ग्युसन कॉलेजांत प्रथम इंग्रजी शिकवावयास लागले.

फर्ग्युसन कॉलेज अस्तित्वांत येऊन त्या वेळीं अवघी तीन वर्षे झाली होती. याच वर्षी फर्स्ट बी. ए.चा वर्ग सुरू झाला व १८९२ पासून तें संपूर्ण आर्ट्स् कॉलेज झालें. गोपाळराव व प्रो. केळकर हे दोघे इंग्रजीचे प्रोफेसर होते. गोपाळरावजींची इंग्रजी शिकविण्याची पद्धत शिस्तीची, मेहनतीची व विद्यार्थ्यांस परीक्षेस उपयोगी पडणारी होती. केळकरांची पद्धत चटकदार, हृद्यंगम व चित्तवृत्ति तल्लीन करणारी होती. एकीनें विचारास चालन मिळाल्यास दुसरीनें मनोवृत्ति प्रसन्न होत. एकीनें विषयाची नीट मांडणी केल्यास दुसरीनें विषयांमध्यें नैसर्गिक अभिरुचि उत्पन्न होत असे. कित्येक वेळां एक नीरस परंतु फलदायी व दुसरी अल्पपरिणामकारक परंतु चित्ताकर्षक असे. याप्रमाणें या दोन शिक्षकांमध्यें शिकविण्याच्या पद्धतींत भेद होता. नैसर्गिक प्रकृतिभेदाप्रमाणें कांहीं विद्यार्थ्यांची गोखल्यांबद्दल तर कांहींची केळकरांबद्दल स्वाभाविक भक्ति होती. १८९० सालीं टिळकांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटी सोडल्यानंतर गोखले गणित शिकवीत होते व तें काम त्यांनीं १८९१ पर्यंत केलें.

पुढें गणिताची रिकामी झालेली जागा प्रो. कर्व्यांनीं भरून काढिली. यानंतर गोखले इंग्लंडचा इतिहास व अर्थशास्त्र शिकवीत असत. या दोन्ही विषयांवरील त्यांचीं व्याख्यानें फार हृद्यंगम असत. इंग्रजी इतिहास शिकवितांना इंग्लंडांतील शासनसंस्था, त्यांचा विकास, प्रजासत्ताक राज्यपद्धतीचा विस्तार, अनियंत्रित राज्यसत्तेचें होत गेलेलें नियंत्रण, आयर्लंडांतील स्वातंत्र्य मिळविण्याचा प्रयत्न, या व अशा अनेक विषयांची व्यवस्थित रीतीनें चर्चा

करून हिंदुस्थानच्या परिस्थितीशीं तुलना करून इंग्लंडच्या इतिहासाचें रहस्य विद्यार्थ्यांच्या मनावर ते ठसवीत असत. त्यांची अर्थशास्त्रावरील व्याख्यानें फार मार्मिक असून त्यांनीं विद्यार्थी तल्लीन होत असत. प्रचलित असलेल्या अर्थ-शास्त्राच्या प्रश्नांचा आपल्या व्याख्यानांत ते उहापोह करीत असत. जमीनमहसूल, त्याचा बोजा व त्याचें स्वरूप, शेतकऱ्यांची स्थिति, कर व त्यांचें प्रमाण, चलनी पद्धति, अप्रतिबद्ध व्यापार व त्याचे हिंदुस्थानांवरील परिणाम, या सर्व प्रश्नांचा त्यांनीं वर्गांत केलेला खल व शिकविलेल्या कल्पना पुष्कळ विद्यार्थ्यांस त्यांच्या पुढील आयुष्यांत अर्थशास्त्राचे बिकट प्रश्न आकलन करण्यास फार उपयोगी पडल्या आहेत.

गोपाळरावजी न्यू इंग्लिश स्कुलांत लाईफ मेंबर झाल्यानंतर सुमारें एक वर्षा नंतर तेथें तंटे सुरू झाले. दोन पक्ष झाले, एक आगरकारांचा व दुसरा टिळकांचा. प्रथमतः हें भांडण तत्त्वाबद्दल होतें. सामाजिक सुधारणा, तिची अवश्यकता, राजकीय सुधारणा, आधीं सामाजिक कीं राजकीय इत्यादि प्रश्नांबाबत प्रामाणिक मतभेद होते. पुढें हें भांडण इतक्या विकोपास गेलें कीं. व्यक्तिविषयक मत्सर, असूया व द्वेष यांचा त्यांत अंतरभाव झाला. आगरकरांचा केसरीचा संबंध तुटला व सन १८८८ च्या दसऱ्यास सुधारक पत्र अस्तित्वांत आलें. आर्यविजय छापखान्यांतून निघणारा सोमवारचा सुधारक व आर्यभूषण छाप-खान्यांतून निघणारा मंगळवारचा केसरी यांत खडाजंगी वाद सुरू झाला. संमती-वयाच्या बिलाच्या वेळीं सर्व महाराष्ट्र या वादानें दुमदुमून गेलें. सुधारकाच्या सुरुवातीपासून गोपाळरावजी मुख्यत्वेंकरून सुधारकाच्या इंग्रजी शाखेचे संपादक होते. ते केव्हांतरी मराठी लिहीत. सुमारें चार वर्षे त्यांनी इंग्रजी संपादकाचें काम चालविलें. सोसायटींत सामील जाहल्यानंतर आगरकर यांचा सरळ निष्कपट स्वभाव, उदात्त विचार, साधी राहणी, निष्कलंक वर्तन व लोकोत्तर स्वार्थत्याग—या गुणांमुळें आगरकरांची छाप गोपाळराव यांचेवर बसली व ते आगरकरांचेच अनुयायी बनले. डेक्कन एज्युकेशन सोसायटींत त्या वेळीं असलेल्या मंडळींत गोपाळरावच तरुण, होतकरू, पुढें नांव काढतील असे गृहस्थ होते. या दुफळीपासून गोपाळरावांसच पुष्कळ त्रास जाहला. या दुहीमध्यें अवास्तव टीका केली, अपशब्द वापरले, मिथ्या आरोप केले तर आगरकरांस त्याबद्दल कधीं विषाद वाटला नाहीं. जनतेच्या पुढाऱ्याच्या अंगीं अवश्य लाग-णारा असा चेंचवटपणा, टीकेबद्दल बेपरवाई व उदासीनता हे गुण कै. आगर-

करांचे ठिकाणीं संपूर्णपणें वास करीत होते, गोपाळरावांचे अंगी या गुणांचा अभाव होता. यत्किंचितही अवास्तव टीकेनें त्यांचें कोवळें मन कष्टी होई. निरर्गल अपशब्दांनी ते विषण्णमनस्क होत. निराधार आरोपानें त्यांचें अंतःकरण विव्हल होई. यायोगानें त्यांचे प्रकृतीवर परिणाम होत असे. आगरकरांचे वरील गुण गोपाळरावांचे अंगी असते तर त्यांची आयुर्मर्यादा खचित वाढली असती अशी आमची समज आहे. डेक्कन एज्युकेशन सोसायटींतील दुही विकोपास जाऊन १८९० सालीं टिळक व नामजोशी सोसायटीतून निघून गेले. या भांडणाच्या गुणदोषांसंबंधीं वांटणी करण्याचें हें स्थळ नव्हे व हा प्रसंगही नव्हे. इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, टिळकांच्या समवेत नामजोशी व पाटणकर हे दोघेच गृहस्थ बाहेर पडले. आपटे, गोखले गोळे, केळकर, धारप व भानू हे आगरकरांसमवेत सोसायटींत राहिले. सोसायटींत याप्रमाणें बखेडा झाल्यानंतर कांहीं दिवस त्रास झाला तथापि या संकटांतून ही संस्था निभावून तिची दिवसेंदिवस भरभराट होऊन ती सर्व हिंदुस्थानास ललामभूत झाली आहे. ही सोसायटींत जन्मास येऊन बाहेर पडलेली दुही पुढेंही महाराष्ट्रांतील सार्वजनिक आयुष्यक्रमांत गोपाळरावजींच्या अगदीं निधनापर्यंत दिसून आली. गोपाळरावांस सार्वजनिक सभेचे सेक्रेटरी नेमण्याचा विरोध, सार्वजनिक सभेवरील चढाई, डेक्कनसभेबद्दल रानडे यांची संभावना, गोखल्यांची माफी, इनॉक्युलेशनबद्दल अविचारी विरोध, राष्ट्रीय सभेंतील भांडणें, सुरतेचा प्रसंग, त्यानंतर गोपाळरावजींवर केलेले मिथ्या आरोप, समेट प्रकरण, गोपाळरावजींसंबंधीं अगदीं अखेरीस काढलेले आसुरी उद्गार या सर्वांचे मुळाशीं या दुहीचें अस्तित्व होतें. कित्येक पुढाऱ्यांस, एखाद्या थोर व्यक्तीच्या नेतृत्वाखालीं काम करण्यास किंवा एखाद्या प्रश्नाबद्दल मतभेद असला तरी इतर कामांत सहकारितेनें सार्वजनिक चळवळ करण्यास प्रत्यवाय येत नाहीं. कित्येकांस एकमेव अद्वितीय अशी स्थिति असली तरच काम करितां येतें; एकछत्री सूत्रधारीपणा आल्यानंतरच अनेक छात्रगणांसह काम करण्याची हिंम्मत प्राप्त होते; हा स्वभावदोष आहे व तो दुरतिक्रम आहे. परंतु सार्वजनिक आयुष्यक्रमांत महाराष्ट्रांत तरी अनेक खेदजनक प्रकार आज २५ वर्षें या स्वभावदोषामुळें दिसून आले आहेत हें निःसंशय आहे.

१८९५ पासून सोसायटीतील पुढारीपणा गोपाळरावांकडेच आला. सरकारशी पत्रव्यवहार करणें, वर्गणी गोळा करणें, हीं सर्व कामें गोपाळरावांगच करावी लागत. १८९२ सालीं फर्ग्युसन कॉलेजाच्या इमारतीचा पायाचा दगड बसविला व इमारतीकरितां पैसे गोळा करण्यास गोपाळरावजीस पुष्कळ हिंडावें लागलें. गोपाळरावजीच्या दीर्घ परिश्रमानें अवघ्या तीन वर्षांचे आंत कॉलेजाची भव्य व सुंदर इमारत सोसायटीस उठवितां आली. अनेक प्रकारच्या अडचणींस तोंड देऊन, सोसायटीची सांपत्तिक स्थिति सुधारण्याच्या कामी व सोसायटीच्या वाढत्या संस्थांस स्थैर्य आणण्याचे कामीं त्यांनी अतोनात प्रयत्न केले. तसेंच सोसायटींत असतांना व सोसायटीचा कायदेशीर संबंध संपून पेन्शन घेतल्यानंतरही पुष्कळ आणीबाणीच्या व सोसायटीच्या घटनेंत क्रांति उत्पन्न करणाऱ्या संकटसमयी आपल्या सल्ल्यानें, वजनानें, धोरणानें व मुत्सद्देगिरीनें त्यांनी सोसायटीवर आलेल्या अरिष्टांचें निवारण केलें. अनन्यसदृश अशा योग्यतेस फर्ग्युसन कॉलेजास ज्या पुरुषांनी आपल्या परिश्रमानें आजकाल आणलें आहे त्यांमध्यें गोपाळरावजींसच प्रमुखस्थान द्यावें लागेल. हिंदुस्थानांतील लोकांच्या कर्तबगारीबद्दल व स्वार्थत्यागाबद्दल अत्यंत उज्ज्वल असें उदाहरण म्हणजे डे. ए. सोसायटी हेंच होय व हीच गोष्ट ' पब्लिक सर्व्हिस कमिशन'च्या नुकतीच निदर्शनास आली आहे. ना० परांजपे यांच्यासारख्या शिक्षणाच्या बाबतींत नैपुण्य संपादन केलेल्या स्वार्थत्यागी गृहस्थास जें मत अधिकारानें देतां आलें, जो पुरावा कमिशनपुढें मांडतां आला व जी ओजस्विता प्रकट करतां आली, त्या सर्वांचें रहस्यही कमिशनर गोपाळराव व साक्षीदार ना० परांजपे यांचेमधील गुरुशिष्यसंबंध हेंच होय.

१९०५ सालीं तारीख १२ जून रोजीं गोपाळरावजींनीं ' सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी ' ही संस्था स्थापन केली व तिच्या पायाचा दगड गोपाळरावांचे स्नेही व सार्वजनिक सभेचे सेक्रेटरी आबासाहेब साठे यांचे हस्तें बसविण्यांत आला. उत्क्रांतीच्या दृष्टीनें ही संस्था डे. ए. सोसायटीचें परिणत फळ होय. वीस वर्षें अध्ययन व अध्यापन यांसारख्या पवित्र कार्यांत घालवून व कॉलेजच्या कामांतून तावून सुलाखून निघाल्यानंतरच परिपक्व झालेल्या बुद्धीस देशकार्याच्या सर्वव्यापक व भारदस्त स्वरूपाची जबाबदारी घेण्यास निःसंशय पात्रता येते. विद्वत्ता व अनुभव यांच्या जोडीमुळें देशकार्य करण्याची कुवतही निर्विवाद वाढते. या दृष्टीनें विचार करतां ही डे. ए. सो-



**प. वा. रा. शिवराम हरि ऊर्फ आबा साठे**

( यांनीं ता १२ जून १९०५ रोजीं सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीच्या पायाचा दगड बसविला. )

सायटी व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी यांतील कार्यकारणसंबंध मननीय आहे. व गोपाळरावजीचें उदाहरण डे. ए. सोसायटींतील मंडळीकडून गिरविलें जाईल याबद्दल आम्हांस भरंवसा आहे.

१८८७ सालीं रा. आबासाहेब साठ्यांच्या माहितीनें गोपाळरावजींस रा. ब. रानड्यांच्या भेटीचा लाभ झाला व माधवरावजींपाशीं राजकीय शिक्षणाचा लाभ करून घेण्यास त्यानीं प्रारंभ केला. १८८८ सालीं ते सार्वजनिक सभेचे दुय्यम सेक्रेटरी झाले व १८९० सालीं तिच्या त्रैमासिकाचे ते संपादक झाले. 'सार्वजनिक सभा' ही संस्था त्यावेळीं खऱ्या राजकीय ज्ञानाची अधिष्ठात्री होती. हिंदुस्थानांतील अत्यंत देदीप्यमान ज्ञानरवीच्या प्रकाशानें सार्वजनिक सभेची किरणें सर्व हिंदुस्थानास प्रकाशमान करीत असत. न्या. **रानडे** यांच्या प्रगल्भ, उदात्त व विशाल बुद्धिमत्तेमुळें व त्यांच्या नेतृत्वाखालीं सार्वजनिक सभेचा व तिच्या त्रैमासिकाचा सर्वत्र बोलबाला होता. प्रत्येक राजकीय प्रश्नाबद्दल साधकबाधक व सप्रमाण विचार करून त्याबद्दल सभेचा अभिप्राय राज्यकर्त्यापुढें ठेवणें व लोकांमध्यें राजकीय जागृति उत्पन्न करणें, हा क्रम सार्वजनिक सभेनें चालविला होता. सार्वजनिक सभेच्या कोणत्याही म्हणण्यास त्या काळच्या परिस्थितीतही सत्ताधारी वर्ग फार मान देत असे. या कारणांमुळेंच सार्वजनिक सभेच्या सेक्रेटरीचा मिळालेला मान गोपाळरावांच्या आयुष्यांत फार महत्वाचा होता. गोपाळरावांच्या भावी उत्कर्षाचा हा पायाच होय. या वेळेपासून न्यायमूर्तीच्या निधनापर्यंत, म्हणजे सुमार १५ वर्षे, गोपाळरावजींनीं माधवरावांच्या जवळ शिष्यवृत्तीनें राहून मिळालेल्या ज्ञानाचा संग्रह केला. त्यांची दुराराध्य मर्जी सुप्रसन्न करून घेण्याची अहर्निश खटपट केली. त्यांची खडतर सेवावृत्ति ममत्वानें, भक्तीनें, उत्साहानें, झटून केली. शेंकडों मेमोरियलें, अर्ज व अर्जाचे मसुदे लिहून दाखविले; राजनीतिशास्त्रावरील पुष्कळ ग्रंथांचें परिशीलन केलें; सरकारी रिपोर्टांचें रहस्य समजून घेतलें; हिंदुस्थानच्या उन्नतीच्या मार्गाचें खरें ज्ञान संपादन केलें. भावी उन्नतीच्या सर्व व्यापक स्वरूपाची कल्पना करून घेतली. उद्योगक्षमता, सहनशीलता, विनय व निस्सिम देशभक्ति यांचा कित्ता गिरविला. अशा तयारीनें दीर्घ परिश्रमानें व स्वतःच्या स्वार्थत्यागासारख्या अलौकिक गुणामुळें या सद्‌शिष्याची योग्यता या सद्‌गुरूहूनही वाढली यांत नवल तें काय ?

१८८८ सालीं गोपाळराव सार्वजनिक कामांत पुढाकार घेऊं लागले. राष्ट्रीय सभा व प्रांतिक सभा यांमध्यें ते भारदस्त भाषण करूं लागले. चाणाक्ष लोकांनीं तेव्हांपासूनच ते फार थोर पुरुष होतील असा कयास केला. Rising Star of the Deccan असें त्यांस म्हणूं लागले. मुंबई इलाख्यांतील पहिल्या प्रांतिक सभेचें त्यांस सेक्रेटरी नेमण्यांत आलें. सुमारें ४ वर्षें मुंबईच्या प्रांतिक सभेचें ते सेक्रेटरी होते. १८९५ साली पुण्यास भरलेल्या **राष्ट्रीय सभेचे**ही ते सेक्रेटरी होते. १८९७ साली वेल्बी कमिशनपुढें विलायतेस हिंदुस्थानच्या वतीनें गेलेल्या प्रतिनिधींपैकीं ते एक होते. त्यांची साक्ष हिंदुस्थानच्या वतीनें झालेल्या सर्व साक्षींत महत्त्वाची आहे. उलट तपासाचे वेळीं, कसोशीनें विचारलेल्या प्रश्नांस त्यांनी जीं समयसूचक, मार्मिक व बाकबगार उत्तरें दिली त्यांवरून हिंदुस्थानच्या परिस्थितीचें त्यांचें अवलोकन किती सूक्ष्म, किती विशाल व किती बिनचूक होतें हें सर्वांच्या निदर्शनास आलें. या साक्षीच्या योगानें गोपाळरावांची बढती प्रांतिक पुढाऱ्यांतून राष्ट्रीय पुढाऱ्यांत झाली.

गोपाळराव यावेळीं इंग्लंडांत असतांना पुण्यास प्लेगची साथ उत्पन्न झाली. प्लेगचें निर्मूलन करण्याकरितां सेग्रिगेशन, डिसइन्फेक्शन वगैरे जे उपाय अमलांत आले व ते ज्या माणसांकडून करविले त्यांबद्दल—म्हणजे सोल्जर लोकांबद्दल—फारच गवगवा झाला. पुष्कळ लोकांना त्रास सोसावा लागला. अनेक अनन्वित कृत्यांचे त्यांजवर आरोप करण्यांत आले. प्लेगनें त्रासलेलें लोकमत फारच प्रक्षुब्ध झालें. इकडे झालेल्या दुःखाची कहाणी पत्रद्वारें गोपाळरावांस कळविण्यांत आली होती. लोकांस झालेल्या दुःखाचें निवारण व्हावें या हेतूनें गोपाळरावांनीं ती हकीकत सर वुइल्यम वेडरबर्न व दादाभाई यांच्या सल्यानें इंग्लंडांत प्रसिद्ध केली. या योगानें इंग्लंडांत चळवळ उडून गेली. इंग्लंडातील अधिकाऱ्यांकडून मुंबई सरकाराकडे चौकशीच्या तारा आल्या. मुंबई सरकारनें पांच प्रश्नांच्या पत्रिका पुण्यांत पांचशें गृहस्थांकडे पाठवून गोपाळरावानीं केलेल्या विधानाचा पुरावा कोणापाशीं आहे काय ? निदान ऐकीव माहिती तरी कोणास आहे काय, अशी ताबडतोब चौकशी केली व तींत कोणाकडून पुरावा न आल्यामुळें गोखल्याचीं विधानें ‘ दुष्टपणाची केवळ रचीव आहेत. साफ खोटी आहेत ’ असें तारेनें उत्तर पाठविलें. इंग्लंडहून गोपाळराव स्वदेशांत पाय ठेवतात न ठेवतात तोंच त्यांस या आरोपांचें समर्थन

करण्याकरितां आव्हान करण्यांत आलें. परंतु हें समर्थन करणें अशक्य असें दिसून आल्यावरून गोपाळरावानीं आपलीं विधानें मागें घेतली व झालेल्या प्रकाराबद्दल माफी मागितली. पुष्कळ वर्तमानपत्रकारांनीं गोपाळरावांनीं मागितलेल्या माफीबद्दल तिरस्कारबुद्धीनें त्यांची हेटाळणी केली. एकाही वर्तमानपत्राच्या संपादकानें गोपाळरावजीच्या विधानाची सत्यता स्थापन करण्यास मदत केली नाहीं किंवा सार्वजनिक हिताकडें लक्ष देऊन या बाबतींत पुरावा करण्यास कोणीही पुढें आला नाहीं. या प्रसंगामुळें गोपाळरावांस अत्यंत दुःख झालें. कमिशनच्या उत्कृष्ट कामगिरीमुळें सर्वत्र जयजकार होऊन, उल्हासानें स्वदेशीं पाय ठेवतात न ठेवतात तोंच या ओढवलेल्या अपमानास्पद प्रसंगामुळें गोपाळरावांचा फार तेजोभंग झाला. त्यांच्या सरळ, निष्कपट व कोमल अंतःकरणावर या गोष्टीमुळें इतका धक्का बसला कीं या प्रसंगाचें विस्मरण त्यांस आजन्म झालें नाहीं. आपल्यासंबंधीं झालेली टीका अगदीं अवास्तव व गैरशिस्त होती अशी त्यांची पूर्ण खात्री होती. या प्रसंगी त्यास भेटण्यास गेल्या वेळीं त्यानीं एका प्रसिद्ध इंग्लिश मुत्सद्द्याची गोष्ट सांगितली. आपल्या स्वतःच्या देशबांधवांनी अशाच एका प्रसंगी असमंजसपणानें केलेल्या टीकेबद्दल या मुत्सद्द्यानें 'Forgive I must, forget I cannot' असे उद्गार काढले होते. गोपाळरावानींही याच मार्गाचें अवलंबन केलें. वस्तुतः गोपाळरावानीं केलेले आरोप जर समर्थन करतां येण्यासारखे नव्हते तर ते परत घेण्याशिवाय दुसरा कोणताही मार्ग सज्जन मनुष्यास नव्हता. ज्या लोकांविरुद्ध आरोप केले होते त्यांचीच माफी मागणें सर्वस्वी न्याय्य व जरूर होतें. माफीच जर मागावयाची तर ती प्रामाणिकपणाची व संपूर्ण अशीच असली पाहिजे, त्यांत अंगचोरपणा करणें म्हणजे आपला हेतु प्रामाणिक नसून आपली इच्छाही माफी मागण्याची नाहीं असें स्पष्ट दर्शविणें होय. कोणाही सरळ मनाच्या मनुष्यास अर्धवट माफी मागणारा माणूस तिरस्करणीय वाटेल याबद्दल शंका नाहीं कित्येक लोकांच्या मतें माफी मागावयाचीच तर ती शक्य तितक्या मतलबानें मागावी व यालाच वस्तादगिरी म्हणण्याचा प्रघात आहे. परंतु स्पष्ट शब्दांनीं बोलावयाचें झाल्यास ही समजूत अगदीं कोडगेपणाचीच मानली पाहिजे. अशा लोकांस सभ्य पणाचें वारेंही नसतें गोपाळरावांवर निंद्य टीकेचा वर्षाव करणाऱ्या लोकांच्या मानापमानाच्या कल्पना अगदीं कोत्या होत्या असें म्हणावें लागतें. माफीची कल्पना इंग्लिश

समाजांत अगदीं रूढ झालेली आहे. एखाद्या मनुष्याचा आपल्या हातून अपमान झाल्यास त्याची माफी मागणें हा इंग्लिश समाजांत अत्यंत शिष्ट सांप्रदाय मानला जातो. माफी मागण्यांत कोणताही कमीपणा नसून हें कृत्य अगदीं संभावितपणाचें आहे असें मानलें जातें व तें खरें आहे उलटपक्षीं आमच्या. समाजांत ह्या कल्पना इतक्या अंगवळणीं पडलेल्या दिसत नाहींत. या प्रकरणामुळें अनेक फायदे झाले. गोपाळरावांची इभ्रत या कृत्यामुळें इंग्लिश समाजांत अतिशय वाढली. गोपाळरावांच्या शत्रूंनाही गोपाळराव हे उदारमनस्क प्रतिस्पर्धी आहेत असें वाटूं लागलें व

" Unpleasant as the episode was, it served to bring out the true gentleman in Mr. Gokhale and showed that in his hands the honour of his political opponents was as safe as his own. "

एका गृहस्थानें केलेलें वरील विधान पूर्णपणें प्रत्ययास आलें. कोणतेंही विधान करतांना पुष्कळ सावधगिरी बाळगावी लागते, हा धडा गोपाळरावांस या प्रसंगानें मिळाला. गोपाळरावांस वकिलाच्या धंद्याचें ज्ञान नव्हतें; विशिष्ट शिक्षणामुळें व नित्यपरिपाठामुळे वकिलीच्या धंद्यांतील लोकांस आपल्या बाजूचें समर्थन व दुसऱ्या पक्षाचें दोषाविष्करण उत्तम प्रकारें करतां येतें व कोणतेंही विधान करतांना पुष्कळ मर्यादांनीं त्याची व्याप्ति संकुचित करण्याची संवय लागते. या धंद्याशीं अनभिज्ञ लोकांना आपल्या मतानें योग्य व सदसद्विवेकबुद्धीला संमत असलेली गोष्ट न्याय्य व सर्वसंमत होईल असें वाटत असतें. कायद्याचें अनुमान सकृद्दर्शनी सात्विक प्रवृत्तीचें आहे, परंतु व्यवहारांतील अनुभव पदोपदीं याच्या अगदीं उलट येतो. मनुष्यस्वभावाच्या हीन परिस्थितींचा प्रत्यय वकीलीच्या धंद्यांत नित्य पदोपदीं येत असल्यामुळें गोपाळरावांचेकडून झालेली चूक-ते वकील असते तर त्यांजकडून कधीही झाली नसती, व त्यांना आपलीं विधानें परत घेण्याचा प्रसंग आला नसता. परंतु या प्रसंगानें गोपाळरावांच्या शिक्षणांत राहिलेली ही उणीव संपूर्णपणें भरून आली. गोपाळरावांचे हातून यानंतर अवास्तव किंवा बेजबाबदार विधान कधीही करण्यांत आलें नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्यांनीं केलेल्या विधानांबद्दल त्यांच्या पुढील सर्व आयुष्यक्रमांत सत्ताधारी प्रतिपक्षांनीं सुद्धां कोणतीही शंका प्रकट केली नाहीं. तसेंच कोणत्याही बाबतींत टीका करतांना प्रतिपक्ष्याचे हेतु व प्रतिपक्ष्याच्या अडचणी यांची जाणीव ते सदैव

आपल्या डोळ्यांपुढें ठेवूं लागले. गोपाळरावांस जो लोकोत्तर मान यापुढें मिळाला त्याच्या कारणांपैकीं या प्रकरणाचा अनुभव हें एक महत्वाचें कारण होतें. सामान्य गोष्टीपासूनही थोर पुरुषांच्या आयुष्यक्रमास निराळें वळण लागतें असा एक सिद्धांत आहे. ह्याच सिद्धांताचा प्रत्यक्ष अनुभव गोपाळरावांच्या संबंधानेंही या बाबतींत प्रत्ययास आला. आणखी एक लाभ या प्रकरणापासून जो झाला तो गोपाळरावांच्या मनाच्या थोरपणाच्या कसोटीचा होय. ज्या लोकांच्या पत्रांवरून गोपाळरावांस तोंडघशी पडावें लागलें, त्या लोकांवर कोणतीही जबाबदारी न ढकलतां सर्व दोषाचा भार गोपाळरावांनीं आपल्या एकट्यावरच घेतला. आपल्या उच्चारानें किंवा आचरणानें त्यानीं या लोकांस तिळमात्रही दुखविलें नाहीं. १८९७ पासून १९०० पर्यंत गोपाळरावांनीं आपला काल सार्वजनिक दृष्ट्या अज्ञातवासांत घालविला. या प्रकरणामुळें त्यांच्या कोमल व अव्याजमनोहर स्वभावावर इतकी खिन्नता आली होती कीं, त्यांच्याबद्दल अभिमान बाळगणाऱ्या प्रत्येक मनुष्यास पराकाष्ठेचा खेद होत असे. परंतु गोपाळरावांचें वर्तन उदात्त व सात्विक मनोवृत्तीनें प्रेरित झालें असल्यामुळें त्यांच्या पुढील आयुष्यक्रमांत या गोष्टीची आठवणही उरली नाहीं; व त्यांच्या उज्वल कीर्तीस यामुळें यत्किंचित्‌ही कमीपणा आला नाहीं. यावरूनच गोपाळराव व त्यांचे असमंजस टीकाकार यांपैकीं कोणाचें करणें योग्य व न्यायाचें होतें हें निश्चयानें ओळखतां येण्यासारखें आहे.

## प्लेग कमिशन.

१८९८ साली पुण्यांत प्लेग सुरूं झाला. या भयंकर सांथीपासून गरीब लोकांचें संरक्षण करण्याकरितां इनॉक्युलेशनचा प्रसार करण्याचा त्यानीं निश्चय केला. पुष्कळ स्वयंसेवक तयार करून त्यांच्या मदतीनें या उपायाचा प्रसार करण्याची त्यांनीं खटपट केली. तसेंच गरीब लोकांस मदत करण्याकरितां परिश्रम केले. त्या वेळचे प्लेग ऑफिसर कर्नल क्रेग ( पुढें हिंदुस्थानचे कमांडर–इन–चीफ झाले ) यांनीं गोपाळरावांच्या कामाची फार प्रशंसा केली. इनॉक्युलेशनच्या उपायाबद्दल कित्येक पुढाऱ्यांच्या अज्ञानामुळें, दुराग्रहामुळें भलतेच कुतर्क सामान्य लोकांत उत्पन्न झाले होते. याची चौकशी करण्याकरितां १९०० सालीं एक प्लेगकमिशन नेमण्यांत आलें. गोपाळराव या कमिशनचे

सभासद होते. असमंजसपणानें कित्येकांनीं इनॉक्युलेशनविरुद्ध चालविलेली मोहीम बंद झाली असती तर आजवर पुष्कळ नित्राण व निराश्रित गरीब लोकांस या आपत्तीपासून आपले प्राण वांचवितां आले असते. १९०५ साली गोपाळरावजी पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे सर्वानुमतें अध्यक्ष निवडण्यांत आले होते. अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं आपलें काम फार काळजानें केलें. म्युनिसिपालिटीच्या सभा नियमित भरूं लागल्या, कामाचा निकाल शिस्तीनें व जलदीनें होऊं लागला. सभासदांनीं म्युनिसिपालिटीच्या कार्यकारी मंडळीस प्रश्न विचारण्याचा प्रघात याचवेळीं पडला, व कमेटीच्या कामाचा अहवाल छापून तो सभासदांना वाटण्याचा क्रम सुरू झाला. स्थानिक स्वराज्याच्या कामाची माहिती या प्रसंगानें गोपाळरावांस प्रत्यक्षपणें मिळाली.

## मुंबई विश्वविद्यालय.

१८९५ सालीं गोपाळरावाची निवड युनिव्हर्सिटीच्या फेलोच्या जागीं झाली व या संस्थेंत त्यांचा प्रवेश झाला व मरेपर्यंत ते युनिव्हर्सिटीचे फेलो होते. एक वर्ष ते सिंडिकेटचे सभासद होते. युनिव्हर्सिटीच्या व्यवस्थेंत ते फार लक्ष घालीत. लॉर्ड सिडन्हॅम क्लार्क यांनीं विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रमांतून इतिहास विषयास घालवून देण्याचा प्रयत्न केला. गोपाळरावजींनीं या प्रतिगामी धोरणास जोराचा विरोध केला, व सरकारनें विश्वविद्यालयाच्या कारभारांत चालविलेल्या ढवळाढवळीबद्दल त्यानीं निषेध प्रदर्शित केला. इतिहास व अर्थशास्त्र हे त्यांच्या आवडीचे विषय होते. पुष्कळ वर्षें ते युनिव्हर्सिटीचे या विषयांचे व इंग्रजीचे परीक्षक होते. हल्लींचा बी. ए. व एम्. ए. चा इतिहासाचा अभ्यासक्रम त्यांच्या सूचनेस अनुसरूनच ठरविण्यांत आला आहे व त्यांच्याच खटपटीनें राजनीतिशास्त्राचा समावेश बी. ए. च्या अभ्यासक्रमांत झाला आहे. विश्वविद्यालयाबद्दल त्यांची आस्था फारच निःसीम होती. कर्झन साहेबांच्या कारकीर्दींत विश्वविद्यालयाचें स्वातंत्र्य नष्ट करण्याचा प्रयत्न युनिव्हर्सिटी बिलाच्या योगानें झाला. गोपाळरावांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत आपल्या अलौकिक विद्वत्तेनें व बिनमोल कोटिक्रमानें या बिलाच्या चिंधड्या चिंधड्या उडविल्या. पुढें या बिलांतील चुका समर्थन करण्याचा कायदा (Validation Act) कौन्सिलांत आल्या वेळीं सरकारचा उतावीळपणा व अहंमन्यपणा निर्भिडपणानें त्यांनीं उघडकीस आणला. या वेळीं गोपाळरावांनीं केलेल्या कामगिरीबद्दल हिंदु-

स्थानांतील सर्व विद्याभिमानी लोकांनीं त्यांची फार तारीफ केली. गोपाळरावांचें सर्व आयुष्य शिक्षणप्रसारांत गेलें होतें. आपल्या अज्ञ देशबांधवांस शिक्षणाचा लाभ मिळावा म्हणून प्राथमिक शिक्षण मोफत करावें व सक्तीनेसुद्धां त्याचा प्रसार करावा असें बिल त्यानीं कौन्सिलांत आणलें; हें बिल जरी मंजूर झालें नाहीं तथापि या बिलानंतर या प्रश्नाबद्दल लोकमत जागृत झालें व त्याचें सर्व श्रेय गोपाळरावासच आहे.

## प्रांतिक कायदे कौन्सिल.

१८९९ साली मुंबईच्या प्रांतिक कायदे कौन्सिलांत मध्यभागतर्फे गोपाळरावांची निवड झाली. दोन वर्षें ते प्रांतिक कौन्सिलचे सभासद होते. या कालांत दोन महत्त्वाचीं बिलें कौन्सिलपुढें आलीं होतीं. डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल बिल त्या वेळीं पास झालें. गोपाळराव पुष्कळ वर्षें पुणें म्युनिसिपालिटीचे सभासद असल्यामुळें त्यांना या बिलाच्या विषयाची चांगली माहिती होती. या बिलाच्या वादविवादाचे वेळीं त्यांनी सदर बिलावर फार मुद्देसूद व उपयुक्त टीका केली. त्यांच्या अंगच्या विद्वत्तेची साक्ष यावेळीं लोकांस पटूं लागली. दुसरें बिल लँड रेव्हिन्यु कोडाच्या दुरस्तीचें होतें. बिल फार घाईनें पास करून घेण्याचा सरकारचा मानस होता. या बिलाबद्दल फार असंतोष उत्पन्न झाला होता. लोकांस आपलें मत कळविण्यास अवसर द्यावा असें त्यावेळचे लोकनियुक्त सभासदांचे पुढारी सर फेरोजशहा मेथा यानीं सरकारास सुचविलें. परंतु तें सरकारनें ऐकलें नाहीं. लोकमताच्या या अपमानाबद्दल कौन्सिलांतून निघून जाण्याचा निश्चय मेथासाहेबांनीं केला. सरकारनें लोकमताबद्दल दाखविलेल्या बेपर्वाईबद्दल गोपाळरावजींनीं नापसंती व्यक्त केली व नामदार मेथा यांच्या मागून ते कौन्सिलांतन निघून गेले. यावेळीं मुंबईच्या लोकनियुक्त सभासदांनीं दाखविलेला स्वाभिमान व करारीपणा अत्यंत प्रशंसनीय होता. व या उदाहरणानें सार्वजनिक आयुष्यक्रमास तेजस्वीपणा व भारदस्तपणा आला आहे. सर्व हिंदुस्थानांत या बाणेदारपणाची तारीफ झाली. १९०२ साली डेक्कन एज्युकेशन सोसायटींतील नोकरीची मुदत पुरी करून गोपाळराव मोकळे झाले

## न्या. रानडे यांचें स्मारक.

गोपाळरावजींचे गुरु के. न्या. रानडे हे १९०१ सालीं निवर्तले. त्यांच्या स्मारकाबद्दलची चळवळ गोपाळरावांनी फार आस्थेनें व कळकळीनें चालू केली. देशभर हिंडून त्यांनी एक लक्ष रुपये गोळा केले. या फंडाची व्यवस्था करण्याकरितां वजनदार व शास्त्रज्ञ लोकांची एक कमटी नेमण्यांत आली. या कमिटीनें औद्योगिक उन्नतिकरितां शास्त्रीय शोध करण्यासाठीं प्रयोगशाळा स्थापन करण्याचें ठरविलें व कांहीं शिष्यवृत्ती देऊन शास्त्रीय, शोधाचा (Research work) प्रारंभ केला. सरकारशीं पत्रव्यवहार करून या संस्थेस मदत करण्यासंबंधीं गोखले यानी सहानुभूति मिळविली व १९१० सालीं रानडे इंडस्ट्रियल व इकॉनामिक इन्स्टिटयूट ही संस्था मोठ्या थाटानें मुंबईचे गव्हर्नर यांच्या हस्तें उघडण्यांत आली. औद्योगिक उन्नतीचें काम या संस्थेच्या विद्यमानें चालू झालें आहे. सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीच्या अगदीं पुरोभागीं गोपाळरावजींच्या गुरुंचें स्मारक प्रामुख्यानें झळकत आहे. गोपाळराव या संस्थेचे तहाहयात सेक्रेटरी होते.

## वरिष्ठ कायदे कौन्सिल.

१९०२ सालीं नामदार मेथा यानीं वरिष्ठ कायदेकौन्सिलच्या आपल्या जागेचा राजीनामा दिला व गोपाळरावजींस त्यांचे जागीं निवडण्यांत आलें. यावेळेपासून तों अगदीं निधनापर्यंत गोपाळराव वरिष्ठ कायदेकौन्सिलचे सभासद होते. वरिष्ठ कायदेकोन्सिलांत त्यांचें पहिलें भाषण १९०२ च्या मार्चांत झालें. त्यावेळीं लॉर्ड कर्झन हे हिंदुस्थानचे व्हाइसराय होते. हिंदुस्थानच्या सत्ताधारी वर्गांत आपण अल्पवयी म्हणजे अवघे ४३ वर्षांचें आहों, असा त्यांना अभिमान वाटत असे. परंतु लोकपक्षाच्या वतीनें कर्झनसाहेबांशीं सामना करणारे गोपाळरावही त्यावेळी अवघे ३६ वर्षांचे होते. अधिकारानें धुंद व प्रतिकूल टीका करणाराबद्दल अनुदार अशा लॉर्ड कर्झन साहेबांवर सुद्धां गोपाळरावांच्या विद्वत्तेची विनयाची, वक्तृत्वाची, भारदस्तपणाची व मार्मिक टीकेची इतकी छाप पडली कीं १९०४ सालीं त्यांस सी. आय. ई. हा बहुमानाचा किताब खुद्द कर्झन साहेबांनीं अर्पण केला व याप्रसंगीं गुणग्राहक असें स्वदस्तुरचें पत्र लिहून त्यांनीं गोपाळरावांचें अभिनंदन केलें. १९०५ सालीं गोपाळरावानीं सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी स्थापन केली. कर्झनसाहेबांच्या बेपर्वाईच्या व दडप-



रानडे इंडस्ट्रिअल अँड एकॉनॉमिक इन्स्टिट्यूट, पुणें. ( बाहेरून दिसणारा देखावा. )



ानडे इंडस्ट्रिअल अँड एकॉनॉमिक इन्स्टिट्यूट, पुणें. ( आताल दखावा. )

शाहीच्या धोरणामुळें लोकमत अत्यंत क्षुब्ध झालें होतें. बंगालच्या फाळणीमुळें व यासंबंधीं झालेल्या लोकमताच्या पायमल्लीमुळें हिंदुस्थानच्या राजकीय सुधारणांची अवश्यकता तीव्रपणें भासूं लागली. हिंदुस्थानच्या लोकमताचा राज्यकारभारावर यत्किंचितही ताबा नाहीं व राजदरबारांत लोकमतास यत्किंचितही मान नाहीं अशी स्थिति पदोपदीं अनुभवास येऊं लागली. इंग्लंडच्या उदारमनस्क लोकमतापुढें ही स्थिती मांडून कांहींतरी तरणोपाय काढावा या हेतूनें १९०५ सालीं गोपाळराव इंग्लंडास गेले. यावेळीं बाल्फर साहेबांच्या प्रधानमंडळाची सत्ता अगदीं संपुष्टांत आली होती. जनरल इलेक्शन होऊन लवकरच अधिकारक्रांति होईल असा संभव दिसत होता. हिंदुस्थानाबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्यांच्या सहाय्यानें सुमारें दोन महिने हिंदुस्थानचीं गाऱ्हाणीं ब्रिटिश प्रजाजनांपुढें मांडण्याचा त्यानीं प्रयत्न केला. या वेळीं लाला लजपतराय हेही गोपाळरावांचेबरोबर इंग्लंडांत गेले होते. स्वदेशीं परत आल्यावर इंग्लंडांतील कामगिरीबद्दल गोपाळरावांचें सर्वांकडून अभिनंदन करण्यांत आलें. पुण्यामध्यें प्रचंड जाहिरसभेच्या द्वारें डॉक्टर देशमुख यांचे अध्यक्षतेखालीं गोपाळरावांबद्दल आदर व्यक्त करण्यांत आला. याच सालीं हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांस मिळणारा अत्यंत श्रेष्ठप्रतीचा मान—म्हणजे राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान—गोपाळरांस देण्यांत आला. भागीरथीच्या पवित्र तीरावर, काशीसारख्या पुण्यक्षेत्रांत, गोपाळरावांसारख्या सात्विक व महान् देशभक्ताच्या अध्यक्षतेखालीं भरलेली **राष्ट्रीय सभे**ची बैठक फारच अवर्णनीय होती. राजकीय प्रगतीचें अंतिम साध्य याच बैठकींत स्पष्टपणें नमूद करण्यांत आलें. या वेळचें गोपाळरावांचें भाषण फारच जोरदार व उत्साहजनक असून कर्झनसाहेबांच्या राज्यकारभाराचें दोषाविष्करण त्यांत स्पष्टपणें केलें होतें.

१९०६ सालीं लॉर्ड मिंटो साहेबांची कारकीर्द चालू झाली. लॉर्ड मोर्लेसाहेबांनीं हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें धारण केलीं. बंगालच्या फाळणीचे दुष्परिणाम फारच स्पष्टपणें भासूं लागले. सर ब्यांफील्ड फुलर यांनीं लोकमताचा उपमर्द करण्याचा कडेलोट केला. लिबरलपक्ष अधिकारारूढ झाल्यामुळें १९०६ सालीं गोपाळरावांस पुन: इंग्लंडांत जावें लागलें. या वेळीं त्यांनीं सार्वजनिक भाषणें फारशीं न करतां मंत्रिमंडळाच्या मुलाखती घेतल्या. मोर्लेसाहेबांची भेट घेतली. पुष्कळ मुत्सद्दीलोकांस हिंदुस्थानच्या परिस्थितीचें ज्ञान करून दिलें व कौन्सिलच्या

सुधारणेची आवश्यकता स्पष्ट करून सांगितली. फुलरसाहेबांच्या कृत्यांचा ब्रिटिशजनतेपुढें त्यांनीं तीव्रपणें निषेध केला. फुलरसाहेबांस स्वदेशीं जाणें भाग पडलें. गोपाळराव आपली कामगिरी संपवून १९०६ च्या अखेरीस परत स्वदेशीं आले. हिंदुस्थानांत परत आल्यानंतर फाळणीच्या नैराश्यामुळें सनदशीर चळवळीवरील लोकांचा विश्वास नाहींसा झाला होता. ' सिडिशस मीटिंग्ज बिल ' सारखे दडपशाहीचे कायदे प्रक्षुब्ध लोकमतास आळा घालण्याकरितां सत्ताधारी वर्ग करीत होते. दडपशाही व क्रांतिकारक चळवळ ही क्रिया व प्रतिक्रिया याप्रमाणें जोरानेंच वाढूं लागली. या वेळीं राजकीय परिस्थितीचें योग्य निदान करून शक्याशक्य साध्यसाधनांबद्दल लोकांत खऱ्या कल्पनांचा प्रसार करण्याकरितां उत्तरहिंदुस्थानांत व्याख्यानांची मोहीम गोपाळरावांनीं १९०७ साला सुरू केली. अलाहाबाद, लखनौ, दिल्ली, लाहोर, अमृतसर, अलीगड या प्रमुख शहरांत प्रचंड जाहीरसभा भरल्या. हत्तीवरून मिरवणुकी निघाल्या. अनभिषिक्त मान्यांना मिळणारा सर्व मान गोपाळरावजींस मिळाला. वरिष्ठ कायदेकौन्सिलांत गोपाळरावांनीं लॉर्ड मिंटो यांस लोकांचें सांत्वन करण्याबद्दल फार कळकळीची विनंति केली. दडपशाहीच्या धोरणामुळे राजकीय चळवळ करणाऱ्या देशांतील पुढाऱ्यांमध्यें तीव्र मतभेद उत्पन्न झाले. या पक्षभेदाची मजल इतकी दूरवर गेली कीं, सुरत येथें सर्व देशाला प्रिय झालेल्या राष्ट्रीय सभेचा विध्वंस झाला. लॉर्ड मोर्ले साहेबांनीं अधिकारसूत्रें धारण केल्यानंतर हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेंत लोकमताला अवसर द्यावा, या हेतूनें सुधारणेची योजना तयार करण्यास सुरवात केली. राज्यव्यस्थेंतील अगदीं पायाचे घटक म्हणजे म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें यांना स्वातंत्र्य देण्याकरितां एकतंत्री सत्ताधारी वर्गाची अधिकार-विभागणी करण्याकरितां एक कमिशन(Decentralisation Commission) नेमलें. गोपाळरावांनीं या कमिशनपुढें दिलेला पुरावा अत्यंत महत्वाचा असून त्याचें स्वरूप अगदीं नवीन प्रकारचें आहे. हिंदुस्थानच्या प्रगतीची काळजी-पूर्वक विचार करणाऱ्या मनुष्यानें तो मनन करण्यासारखा आहे. सुधारणेच्या योजनेचा विचार लॉर्ड मोर्ले करीत होते. अशा वेळीं हिंदुस्थानच्या लोकांची बाजू स्टेट सेक्रेटरीपुढें चांगल्या रीतीनें मांडली जावी, व हें काम गोपाळरावजींखेरीज दुसऱ्या कोणाचेही हातून योग्य प्रकारें बजावलें जाणार नाहीं, म्हणून त्यांस इंग्लंडास जाण्याबद्दल

इंग्लंडांतील कांहीं हितचिंतक व खुद्द लॉर्ड मिंटो यांनीं आग्रह केला. इंग्लंडांत १९०८ सालीं जाऊन सुधारणेच्या योजनेबद्दल हिंदुस्थानची शक्य ती बाजू गोपाळरावांनीं लॉर्ड मोर्लेयांचेपुढें मांडली. १९०८ च्या अखेरीस ते इंग्लंडाहून परत आले. मोर्ले साहेबांच्या सुधारणाही याच वेळीं प्रसिद्ध झाल्या. १९०९ च्या प्रारंभीं त्यांस अमेरिकेमध्यें एका सर्वमान्य संस्थेकडून व्याख्यानें देण्याबद्दल आमंत्रण करण्यांत आलें होतें; परंतु सुधारणेच्या योजनेस अनुसरून कानू करण्याचें काम त्या वेळीं वरिष्ठ कायदेकौन्सिलपुढें यावयाचें असल्यामुळें त्यांना ही विनंति मान्य करतां आली नाहीं. १९०९ साली क्रांतिकारक चळवळीस फार भयंकर स्वरूप प्राप्त झालें. शांतता राखण्याचे कामीं सहकारितेनें सरकारास मदत करण्याचा गोपाळरावांनीं प्रयत्न केला. १९१० साली लोकांच्या अज्ञानाचा निरास करण्याकरितां प्राथमिकशिक्षण सार्वत्रिक व मोफत करावें अशी त्यांनीं चळवळ सुरू केली याच वेळी साउथ आफ्रिकेमध्यें येथील वसाहत करून राहणाऱ्या लोकांच्या विरुद्ध फार अन्यायाचे कायदे तेथील सरकारकडून होत असून, त्यांची अम्मलबजावणीही फार कठोरपणानें होत होती. साउथ आफ्रिकेंतील सरकारच्या या धोरणास आळा घालण्याकरितां नाताळांत मुदतबंदीनें मजूर पाठविण्याचें बंद करावें असें त्यांनीं सरकारास सुचविलें, व हें त्यांचें म्हणणें सरकारानें मान्यही केलें. १९११ साली 'युनिव्हर्सल रेसिस कॉंग्रेस' या सभेपुढें गोपाळरावांचा एक निबंध वाचण्यांत आला पूर्व व पाश्चात्य संस्कृति व तदनुरोधानें हल्लीच्या परिस्थितींत शिकण्यासारख्या गोष्टी यांचें विवेचन फार हृदयंगमपणें गोपाळरावानीं या निबंधांत केलें आहे. प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याबद्दल त्यांनीं एक बिल १९११ साली वरिष्ठ कायदे कौन्सिलपुढें मांडलें, व मद्रास येथील लोकांनीं आग्रहानें विनंति केल्यावरून त्यांस तिकडे जावें लागलें. तरुणपिढीला उद्देशून त्यांनीं फार मुद्देसूद व्याख्यानें दिलीं. न्या. रानड्यांच्या स्मारकार्थ उभारलेल्या मैलापूर येथील लायब्ररीचा अनावरण समारंभ त्यांच्या हस्तें झाला. या वर्षीं त्यांनीं सर्व देशभर 'एज्युकेशन लीग' स्थापण्याचे प्रयत्न केले. १९१२ सालीं एज्युकेशन बिल वादविवादास येऊन तें नामंजूर करण्यांत आलें. याच वेळीं साउथ आफ्रिकेंतील हिंदी लोकांचा प्रश्न दिवसेंदिवस कठीण होत चालला. तेथील स्थिति अत्यंत अपमानास्पद व असाह्य होऊं लागली. या बाबतींत इंग्लंडांतील मुत्सद्यांशीं वाटाघाट करून कांहीं तरी

तडजोड घडवून आणण्याच्या इच्छेनें गोपाळराव इंग्लंडास गेले, व साउथ आफ्रिकेंत स्वतः जाण्याचें त्यांनी ठरविलें. साउथ आफ्रिकेंतील सरकारकडून इतर हिंदी लोकांप्रमाणें गोपाळरावजींचा अपमान होईल, एवढ्यासाठी त्यांस दक्षिण आफ्रिकेस न जाण्यासाठीं पुष्कळ सद्गृहस्थांनी विनंति केली; त्यांमध्यें लॉर्ड मिंटो हेही होते. परंतु गोपाळरावांचा निर्धार पाहून त्यांचा नाइलाज झाला. साउथ आफ्रिकेस जाण्याचा गोपाळरावांनीं निश्चय केल्यापासून त्यांना सन्मानानें वागविण्यांत यावें याबद्दल खुद्द हिंदुस्थान सरकारकडून व कलोनिअल ऑफिसकडून तजवीज करण्यांत आली होती. साउथ आफ्रिकेंत गोपाळरावांचा झालेला सन्मान अश्रुतपूर्व होता. हिंदुस्थानच्या बाहेर अशा प्रकारचा सन्मान आजपर्यंत साम्राज्यांत कोणालाही मिळालेला नाहीं. परमुलुखांतील परराष्ट्राच्या एखाद्या वकिलाप्रमाणें ( ambassador ) किंवा प्रधानाप्रमाणें गोपाळरावांचा झालेला सत्कार वाचून साम्राज्यांतील प्रत्येक हिंदी मनुष्यास धन्यता वाटली. हिंदी नांवास साम्राज्यामध्यें जें अपमानास्पद स्वरूप आजपर्यंत मिळालें होतें, तें या प्रसंगीं तरी नाहींसें झालें. स्वतंत्र राष्ट्रांच्या पुढाऱ्यांप्रमाणें या दास्यत्वांतील राष्ट्रांतील एका प्रजाजनास समतेनें,आदरानें व प्रतिष्ठेनें वागविण्यांत आलें, याबद्दल हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्यास कौतुक वाटलें. राष्ट्रीय पुढाऱ्यांतून साम्राज्यांतील पुढाऱ्यांत गोपाळरावांची बढती झाली. हिंदी नांवाचा व मातृभूमीचा या प्रसंगानें उद्धार झाला. याच सालीं गोपाळरावजींची

## पब्लिक सर्व्हिस कमिशन

मध्यें नेमणूक करण्यांत आली. १९१३ सालीं पब्लिक सर्व्हिस कमिशनचें काम चालू झालें. साउथ आफ्रिकेंतील लढा अगदीं निकरास आला. सत्याग्रहाच्या चळवळीस पुन्हां प्रारंभ झाला. देशभक्त गांधी यांस मदत करण्याकरितां मोठा फंड उभारण्याचें गोपाळरावांनीं ठरविलें. पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या कामाचा बोजा गोपाळरावजींवर फारच पडला. कमिशन चालल्या वेळीं लेखी आलेलीं उत्तरें त्यांस साद्यंत वाचून पहावीं लागत. साक्षीदारांकडून जी अनुकूल माहिती काढावयाची तिच्याबद्दल त्यांस पुष्कळ परिश्रम करावे लागत. युरोपियन व सरकारी नोकरींतील साक्षीदार विशिष्ट कलानेंच साक्षीस येत. त्यांच्यापासून अनुकूल

उत्तरें काढणें हें किती त्रासाचें काम होतें, हें साक्षीदारांच्या उलट तपासणीवरून सहज दिसून येणार आहे. कमिशनच्या रचनेमध्यें हिंदुस्थानच्या वतीचे तीनच सभासद आहेत, परंतु हिंदुस्थानची बाजू संभाळण्याचें काम कमिशनच्या सुरुवातीस बरेच दिवस एकट्या गोपाळरावजींवरच पडलें होतें. कमिशनच्या प्रारंभींच्या बैठकीस एतद्देशीय सभासदांचा कल कसा होता व त्यांनी विचारलेले प्रश्न कोणत्या स्वरूपाचे होते, यावरून आमच्या म्हणण्याची सत्यता दिसून येईल. कमिशनमध्यें काम करीत असतांना अवघी चार तासमुद्धां विश्रांति त्यांस मिळत नसे. पहांटे दोन वाजतां उठून दुसरे दिवशीं होणाऱ्या साक्षीदारांचा सर्व लेखी पुरावा त्यांस वाचावा लागे. सकाळीं आठ वाजेपर्यंत हें काम चाले. सुमारें साडेदहा वाजतां कमिशनचे कामास सुरुवात होई व तें पांच वाजेपर्यंत चाले. यानंतर प्रत्येक ठिकाणीं पुष्कळ लोक भेटावयास येत. रात्रीचे वेळीं बहुतेक युरोपियन किंवा नेटिव थोर गृहस्थांच्या घरीं मेजवानीस जावें लागे. हे प्रसंग टाळण्यासारखे नव्हते. कारण या प्रसंगीं पुष्कळ लोकांच्या मुलाखती खासगी स्वरूपानें होऊन कमिशनच्या कामाबद्दल वाटावाट करण्यास व लोकमत समजून घेण्यास फार मदत होई, याप्रमाणें बहुतेक प्रत्येक दिवशीं रात्रीचे ११ वाजेपर्यंत त्यांचा कार्यक्रम होता. मधुमेहाच्या विकारानें आधींच निःशक्त झालेल्या शरीरावर, या कामाचा फारच ताण पडला, व कमिशनची बैठक दिल्लीस येईपावेतों ते अगदीं थकून गेले. कमिशन मद्रासेस असतांना सरकारी अधिकाऱ्यांची सामान्य विधानांच्या योगानें उलट तपासणीस फारच गाळण उडाली. याचा प्रतिकार करण्याकरितां कलकत्त्यास अधिकारि–वर्गानें बरीच तयारी केली होती, व एतद्देशीय लोकांच्या नालायकीचीं उदाहरणें गोळा करून आपली बाजू समर्थन करण्याचा त्यांनीं मोठा प्रयत्न केला होता. परंतु गोपाळरावजींनीं बंगाल्यांतील सर्व एतद्देशीय सिव्हिल सर्व्हिसमधील अधिकाऱ्यांचा इतिहास साग्र मिळविला होता; व प्रतिपक्षाचें कोणतेंही विधान खोडून काढण्याची त्यांनीं तयारी केली होती.

गोपाळरावजींस पुष्कळ परिश्रम करून माहिती मिळवावी लागली; व ती थोडक्या अवधींत मिळवावयाची असल्यामुळें त्यांस फार मानसिक श्रम पडले. कलकत्त्यास पहिली महत्त्वाची साक्ष जस्टिस कार्नेडुफ यांची झाली, व त्यांच्या उलट–तपासांत सरकारची बाजू लंगडी आहे हें गोपाळरावजींनीं स्पष्टपणें व साधार निदर्शनास आणिलें. अशा रीतीनें गोपाळरावजींस फारच परिश्रम करावे लागत. या कामाच्या घाईतच देशभक्त गांधी यांस मदत करण्याकरितां त्यांस हिंडावें लागे, वेळांत वेळ काढून वर्गणी जमविण्याकरितां पुष्कळ गृहस्थांच्या घरीं जावें लागे. या यातायातींतच ते १९१३ च्या फेब्रवारीमध्यें लाहोरास गेले. वर्गणी जमविण्याकरितां दोन दिवस त्यांनीं अविश्रांत खटपट केली. दोन दिवसांत सुमारें २५ हजार रुपये गोळा केले. हृद्याचा आजार याच वेळीं त्यांस जडला, व शेवटीं त्यांतच त्यांचा अंत झाला. आजारी असतांनाच ते मे महिन्यामध्यें कमिशनच्या कामासाठीं विलायतेस गेले व ऑक्टोबरमध्यें परत आले. आल्यानंतर पुन्हां साउथ आफ्रिकेसंबंधीं लढा निकराला पोंचला. या वेळेपासून तों सालोमन–कमिशनचा निकाल होईपर्यंत, गोपाळरावजींचा व लॉर्ड हार्डिंज यांचा एकसारखा पत्रव्यवहार चालू होता; कित्येक दिवस तर रोज तारायंत्रानें बाटाघाट चालू होती. ही कामगिरी फारच नाजुक व जबाबदारीची असल्यामुळें गोपाळरावांना मानसिक स्वास्थ्य न मिळतां त्यांची प्रकृति ढांसळली. १९१४चा बहुतेक काळ पब्लिक सर्व्हिस कमिशनचे कामांतच गेला. या वर्षीं त्यांस विलायतेस जावें लागलें. नवंबरच्या अखेरीस ते हिंदुस्थानांत परत आले. त्यांची प्रकृति अगदींच खालावली, डॉक्टरांनीं त्यांस विश्रांति घेण्यास सक्तीनें भाग पाडलें. दिसेंबरपासून ते पुण्यासच राहिले. तथापि तेथील राजकीय वादग्रस्त प्रश्नांनीं त्यांस विश्रांति ही मिळालीच नाहीं. मरणाच्यापूर्वीं अगदीं तीन दिवस ते या देशाच्या भावी स्थितीबद्दल एक महत्वाचा मसुदा तयार करण्यांत गुंतले होते. अशा रीतीनें शारीरिक परिस्थितीची यत्किंचितही पर्वा न करितां परमेश्वराच्या सत्तेनें मिळालेल्या काळाचा त्यांनीं अखेरपर्यंत देशसेवेकरितां उपयोग केला; व शेवटीं शांतपणानें त्यांनीं इहलोकची यात्रा तारीख १९ फेब्रुवारी १९१५ रोजीं संपविली.

वरीलप्रमाणें गोपाळरावजींचें त्रोटक जीवनवृत्त वाचकांकरितां दिलें आहे. गोपाळरावजीबद्दल आम्हांस जो अभिमान वाटत आहे तो त्यांच्या अलौकिक मुत्सद्देगिरीबद्दल, निस्सीम देशभक्तीबद्दल, उज्ज्वल स्वार्थत्यागाबद्दल, व्यापक व निर्दोष अशा परिस्थितीच्या अजमावाबद्दल होय व याच गुणां-संबंधी स्पष्टीकरण करणाऱ्या त्यांच्या चरित्रांतील ठळक गोष्टींचें येथें सविस्तर विवरण करण्यांत येणार आहे.

## राजनीतिशास्त्राचें ज्ञान.

या देशाच्या पुढाऱ्यांमध्यें राजकारणी व मुत्सद्दी असे दोन वर्ग आहेत. देशाच्या स्थितीचा विचार करून हक्कांची जागृति लोकांत उत्पन्न करणें, अन्यायांचें आविष्करण करणें व स्वराज्याच्या हक्कांबद्दल चळवळ चालविणें हींच राजकारणी पुरुषांचीं कामें आहेत. मुत्सद्यांस हीं सर्व कामें करावीं लागून, राज्यकर्त्यांशीं सलोख्यानें व सहकारितेनें वागून, राजनीतीच्या सर्व साधनांनीं देशोन्नतीस मूर्त स्वरूप आणून द्यावयाचें असतें. अर्थात् ही कामगिरी अधिक जबाबदारीची, अधिक महत्त्वाची व अधिक उपयुक्ततेची आहे. उत्कृष्ट हिंदी मुत्सद्दी होण्यास अनेक गुण अंगी असावे लागतात. त्यांपैकीं **पहिला गुण** म्हणजे देशाच्या स्थितीचें व राजनीतिशास्त्राचें यथार्थ ज्ञान होय. राजनीतिशास्त्र ( Politics ) हें इतर शास्त्रांप्रमाणें स्वतंत्र शास्त्र आहे; त्याची अभ्यासपरंपरा आहे; त्याकरितां विशिष्ट ज्ञान संपादन करणें जरूर आहे. ही कल्पना आपल्या समाजांत रूढ आहे असें दिसत नाहीं. विश्वविद्यालयां-तूनही आंकडेशास्त्र ( Statistics ), जमाबंदी (Finance), राज्यव्यवस्था ( Administration ) इत्यादि विषयांचा अमेरिकन युनिव्हर्सिट्यांप्रमाणें समावेश झालेला नाहीं. अलीकडील कॉलेजांतील अभ्यासक्रमांत राज्यव्यवस्थेच्या-संबंधींची माहिती हा एक अवश्यक विषय करण्यांत आला आहे. पाहिजे त्या मनुष्यास राजकारणांतील कोणत्याही प्रश्नाबद्दल मत देतां येतें अशी सामान्यपणें समजूत आहे. वकिली, वैद्यकी, इंजिनिअरिंग वगैरे धंद्यांस विशिष्ट प्रकारच्या शिक्षणाची जरूरी लागते. परंतु पोलिटिशियन बनण्यास किंवा वर्तमानपत्राचा संपादक होण्यास कोणत्याही प्रकारच्या विशिष्ट ज्ञानाची किंवा पूर्व तयारीची जरूरच भासत नाहीं. अर्थात् राजकारणांत मिरविणाऱ्या अशा लोकांच्या बोलण्यास किंवा लिहिण्यास मुळींच मान मिळत नाहीं यांत आश्चर्य कोणतें ? हिंदुस्थानासंबंधींच्या

कोणत्याही एका विषयाचें अध्ययन करण्यासमुद्धां पुष्कळ काळ लागेल. म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलें—यांची उत्पत्ति, वाढ व स्वरूप, जमाखर्चाची पद्धति ( fnance, ) बजेटाची मांडणी, होम चार्जिस, सांपत्तिक ऱ्हास ( Drain ), राष्ट्रीय कर्ज, रेल्वे व पाटबंधारे, जमीनधाऱ्याच्या पद्धति, करांचा बोजा, नाणें व चलनपद्धति, शिक्षणाच्या बाबतींत होणारा खर्च, त्याची वाढ, त्याचें स्वरूप व त्याच्या सर्वांगांचा विचार, सरकारी नोकरींतील देशी व विदेशी लोकांचें प्रमाण, परदेशांतील वसाहतींसंबंधींच्या प्रश्नांची माहिती, शेतकी व शेतकरी वर्गाच्या सांपत्तिक स्थितीचा प्रश्न, मृत्युसंख्येची वाढ, दुष्काळ व त्यासंबंधीं उपाय, दारिद्र्य व सहकारितेची चळवळ,—हे व यांसारख्या राजनीतिशास्त्रांत समावेश होणाऱ्या दुसऱ्या विषयांचें अध्ययन करण्यास पुष्कळ वेळ खर्चून विशिष्ट ज्ञान संपादन करणें अत्यंत अवश्य आहे. परंतु अशा प्रकारचे लोक आपल्यामध्यें किती आहेत ? तत्त्वज्ञानाप्रमाणेंच हल्लींच्या आपल्या राजनीतिशास्त्राची स्थिति आहे. हजारों सुशिक्षितांपैकीं फार थोड्या लोकांना हें शास्त्र समजून घेण्याची व यांत सिद्धि मिळविण्याची इच्छा असते. अशी इच्छा असलेल्या मर्यादित लोकांपैकीं या शास्त्राचें रहस्य फारच थोड्या लोकांस कळतें. गोपाळरावानीं न्या. रानड्यांच्याजवळ एक तपपर्यंत या शास्त्राचें सोपपत्तिक व आमूलाग्र अध्ययन केलें. त्यानीं आपली पहिली परीक्षा वेल्बी कमिशनपुढें दिली. या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यानंतर पुढें एक तपपर्यंत त्यानीं कायदेकौन्सिलांत याच शास्त्राचा व्यासंग ठेवला होता. गोपाळरावांच्या या तयारीमुळेंच वरिष्ठ कायदेकौन्सिलांत व इतर सर्वत्र त्यांचें तेज पडत गेलें. त्यांच्या माहितीबद्दल कोणासही एक शब्द काढण्याची छाती नव्हती. १९११ सालीं हिंदुस्थानांतील वाढत्या खर्चासंबंधानें त्यानीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत एक ठराव आणला होता. सरकारच्या सर्व खात्यांतून उत्पन्नापेक्षां खर्चाचें मान वाढत आहे व त्यास आळा घालणें अवश्य आहे, असा त्यांच्या ठरावाचा आशय होता. तीस वर्षांतील जमेच्या व खर्चाच्या वाढीचे सर्व आंकडे गोपाळरावानीं तयार केले होते. या ठरावासंबंधीं व्हाइसरॉय साहेबांच्या कार्यकारी कौन्सिलांत ( Executive Council ) बरीच वाटाघाट झाली. गोपाळरावांची माहिती किंवा त्यानीं दिलेले आंकडे यासंबंधीं चौकशी करून ते बरोबर आहेत असें दिसल्यास मग या प्रश्नाचा विचार करतां येईल, या सबबीवर हा ठराव फेंटाळून लावावा असें एकानें सुचविलें. दुसऱ्या एका गृहस्थानेंही

कांहींतरी सबबीवर ठराव उपयुक्त नाहीं असें म्हणून त्यास धुडकून द्यावें असा सल्ला दिला. परंतु त्या वेळचे हिंदुस्थानचे मुख्य फडणवीस यानी असा स्पष्ट सल्ला दिला कीं, गोपाळरावांच्या आंकड्यांबद्दल किंवा विधानांबद्दल कोणताही दोष काढतां येणार नाही, व आपण टाळाटाळीचीं उत्तरें देण्यास तयार नाहीं. फडणविसांच्या या उत्तरामुळें सरकारास हा ठराव कबूल करावा लागला व वाढत्या खर्चाची चौकशी करण्याचें सरकारनें आश्वासन दिलें. या एका उदाहरणावरून अधिकारयुक्त राजनीतिशास्त्रांतील टीकेचा किती उपयोग होतो व ती किती फलद्रूप होते हें स्पष्टपणें दिसून येईल. कौंसिलांतील टीका व वर्तमानपत्रांतील टीका यांत महदंतर आहे. कौन्सिलाबाहेरील टीका बेजबाबदार रीतीनें केली असतां खपते. कायद्याची मर्यादा उल्लंघन न करतां अप्रयोजकपणानें किंवा अज्ञानानें केलेल्या टीकेकडे कोणीही लक्ष देत नाहीं. कौन्सिलांतील टीका प्रतिपक्षाच्या तोंडावर करावयाची असल्यामुळें ती सप्रमाणच असावी लागते. नाहींतर टीका करणारा मनुष्य उपहासास पात्र होतो. शिवाय ही टीका करतांना विशेष मानसिक धैर्य असावें लागतें. पांच हजार मैलांवर बसून सेक्रेटरी ऑफ स्टेट यांस 'टोणगा' म्हणणें किंवा दूर अंतरावरून व्हाइसरॉय साहेबांस शिव्या देणें यांत मोठासा पुरुषार्थ नाहीं. परंतु निर्भीडपणें सेक्रेटरी ऑफ् स्टेट यांचेपुढें आपली बाजू समर्थन करणें किंवा कर्झन साहेबांसारख्या अधिकारानें धुंद झालेल्या सार्वभौमसत्तेच्या प्रतिनिधीसमोर त्याच्या कृत्याचा जोरदारपणानें निषेध करणें हें फार धैर्याचें व आत्मविश्वासाचें काम आहे. अशा तऱ्हेची टीका करण्यास विषयाचें परिपूर्ण ज्ञान नसल्यास आपल्या बाजूचें समर्थन यत्किंचितही होत नाही. सुधारलेल्या कायदेकौन्सिलांत लोकहिताच्या प्रश्नांवर वादविवाद करण्याची मुभा हल्लींच्या कायद्यानें ठेविली आहे. परंतु प्रांतिक किंवा वरिष्ठ कायदेकौन्सिलांत किती नामदार सभासदांकडून या हक्काचा खरा उपयोग होत आहे ? या हक्काच्या मानानें व नामदारांच्या संख्येच्या मानानें फारच थोडे महत्वाचे ठराव कौन्सिलपुढें येतात. आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन झांकण्याकरितां पुष्कळ नामदार सभासद कांही तरी सबबीवर कोणतें तरी समाधान दर्शवून ते मागें घेत असतात. गोपाळरावांनीं हा हक्क प्राप्त झाल्यानंतर वरिष्ठ कायदेकौन्सिलांत जी कामगिरी बजावली त्याबद्दल खुद्द सर गाय फ्लीट विलसन यांचेच शब्द बिनमोल आहेत. गोखल्यांच्याशिवाय हें कौन्सिल म्हणजे हॅम्लेटच्या पात्राशिवाय हॅम्लेटच्या नाटकाइतकेंच

नीरस आहे असें त्यांनीं कौन्सिलांत बोलून दाखविलें! आपल्या टीकेनें कौन्सिलास रसिकता व सजीवता आणण्याचें श्रेय गोपाळरावांस मिळालें तें केवळ त्यांच्या राजनीतिशास्त्राच्या दीर्घ व्यासंगानेंच होय व यापासून पुढारी होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्यांनीं बोध घेण्यासारखा आहे. सुधारणेच्या योजनेनें मिळालेल्या हक्काचा पूर्ण उपभोग घेण्यास या गुणाची फार आवश्यकता आहे. यासंबंधीं एका मासिकाचे खालील उद्गार मननीय आहेत:—

"But even for obtaining a dialectical victory over the officials a very careful and laborious study of politics, civics, economics, statistics and official publications of all sorts is absolutely necessary. The devotion of odd minutes or hours snatched from a busy professional life or from a life of pleasure-seeking can not serve the purpose. For the officials are paid to master their facts and have ready access to all sources of information. He who would meet and beat them on their own ground can do so only by superior mental calibre and greater mastery of facts, achieved by more careful and industrious study. Mr. Gokhale was the first Indian Member of Council to set an example in this direction. Success cannot be achieved in Indian politics unless his example is largey followed." —*Modern Review*.

## व्यवस्थित मांडणी.

**दुसरा गुण** ह्मणजे विषयाची व्यवस्थित मांडणी हा होय. कोणताही बिकट प्रश्न असला तरी तो इतक्या सुगम तऱ्हेनें मांडण्याची गोपाळरावांची शैली होती कीं, त्यायोगानें ऐकणाराच्या चित्तवृत्ति अगदीं गुंग होऊन जात. कितीही नीरस व शुष्क आंकडे असले तथापि ते ऐकणारांस कर्णमधुर भासविण्याची गोपाळरावांची हातोटी होती. या बाबतींत सर जेम्स मेस्टन यांनीं त्यांची ग्लॅडस्टनबरोबर तुलना केली. एखादा विषय अगदीं नवीन असल्यास त्यांच्या प्रतिपादनपद्धतीनें श्रोत्यांस तो इतका अवगत होई कीं, त्यासंबंधीं त्यांचे ठिकाणीं आस्था व जिज्ञासा हीं तत्काळ उत्पन्न होत असत. "एखादा

गारुडी ज्याप्रमाणें क्षणांत कोय दाखवितो, निमिषमात्रांत त्या कोयीस कोमल पालवी फुटलेली नजरेस येते, व थोड्याच काळांत हृदयंगम फळ त्या पालवीवर दिसूं लागतें, त्याचप्रमाणें गोपाळरावजींची आपल्या विषयाबद्दल चित्तवृत्ति एकाग्र करण्याची हातोटी आहे. एखादी सुधारणा त्यांनीं सुचविली, कीं लगेच तिला दृश्य स्वरूप येऊं लागतें. थोडासा काळ लोटतो न लोटतो तोंच ती शक्य कोटींतील भासूं लागते, व थोड्याशा अवधीनें ती घडवून आणण्याच्या प्रयत्नास सुरुवात करणें भाग पडतें." मेस्टन साहेबांचे हे शब्द किती यथार्थ आहेत हें कोणासही समजून येण्यासारखें आहे. प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न हेंच या अभिप्रायाचें उत्तम मूर्तिमंत उदाहरण आहे. प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न इतक्या बारकाईनें, इतक्या सप्रमाण रीतीनें आजपर्यंत कोणीही मांडलेला नव्हता. प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याचा ठराव त्यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत प्रथमतः १९१० सालीं आणला. याच वेळीं या प्रश्नास सरकारकडून पूर्ण सहानुभूति मिळाली. १९११ सालीं त्यांनीं शिक्षणाचें बिल कौन्सिलपुढें मांडलें, व सरकारकडून याचें दृश्य फल प्राथमिक शिक्षणाकरितां दिल्लीदरबारचे वेळीं दिलेल्या पन्नास लक्षांच्या देणगींत दिसून आलें. १९१२ सालीं खुद्द पार्लमेंटांत त्या वेळचे अंडर सेक्रेटरी मि. मांटेग यांनीं गोपाळरावजींचें अभिनंदन करून सरकारकडून या बाबतींत शक्य ते प्रयत्न करण्याचें आश्वासन दिलें. अस्तित्वांत असलेल्या प्राथमिक शिक्षणाची वाढ शेंकडा ७५ नीं करण्याचें व शाळेंत जाणाऱ्या मुलांची संख्या दुप्पट करण्याचें सरकारकडून जाहीर करण्यांत आलें. या प्रश्नाला इतकें महत्व प्राप्त होण्याचें सर्व श्रेय गोपाळरावजींस आहे असें खुद्द सर गाय विल्सन यांनीं आपल्या बजेटांत निर्दिष्ट केलें आहे. पुष्कळ ज्ञान असून तें व्यवस्थित स्वरूपानें लोकांपुढें मांडण्यांत न आल्यास प्रातिनिधिक संस्थांमध्यें अशा ज्ञानाचा यत्किंचित्‌ही उपयोग होत नाहीं. सबब व्यवस्थित विषयप्रतिपादन हा एक महत्वाचा गुण असून तो गोपाळरावजींच्या अंगीं पूर्णपणें बाणलेला होता. **तिसरा गुण** म्हणजे इंग्लिश भाषेसंबंधानें त्यांची अप्रतिम वाकबगारी हा होय. गोपाळरावजींच्या इतकी शुद्ध व धार्मिक भाषाशैली हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांमध्यें फारच थोड्या लोकांमध्यें वसत आहे. सुमारें वीस वर्षेपर्यंत त्यांनीं इंग्लिश भाषेच्या प्रोफेसराचें काम केलें होतें. कोणताही लेख लिहितांना किंवा भाषण करतांना किंवा एकादें सामान्य पत्र लिहितांना शब्दाची योजना अगदीं योग्य व्हावी

याबद्दल ते अतिशय काळजी घेत; किंबहुना त्यांच्या मनास या प्रकारची दृढ संवयच लागली होती. इंग्लंडसारख्या इंग्रजी भाषेच्या माहेरघरांतसुद्धां गोपाळरावजींच्या इंग्लिश भाषेवरील स्वामित्वाबद्दल पुष्कळ इंग्लिश विद्वानांकडून तारीफ करण्यांत आली आहे. भाषेप्रमाणें त्यांचें वक्तृत्वही अमोघ होतें, हा त्यांचा **चवथा गुण** होय. शब्दाचें अवडंबर, द्विरावृत्ति व मेघनाद हे गुण अद्याप त्यांच्या वक्तृत्वांत नसले, तथापि श्रोतवृंदावर त्यांच्या अस्खलित रसाळ, गंभीर व अमोघ वक्तृत्वाचा नेहमी परिणाम होत असे व चित्तवृत्ति आनंदानें तन्मय होत. एका मार्मिक इंग्लिश गृहस्थानें त्यांच्या वक्तृत्वाबद्दल व त्यांच्या इंग्लिश भाषेच्या ज्ञानाबद्दल दिलेला अभिप्राय प्रशंसनीय आहे:—

"That he was a great orator I can well believe, for his use of English was exact and brilliant and entirely free from the redundancy and magniloquence which is sometimes imputed to Indian eloquence."

याशिवाय नियमित वेळामध्यें आपले विचार नमूद करण्याची विलक्षण हातोटी हा त्यांचा **पांचवा गुण** होय. पाल्हाळिक वक्तृत्वानें किंवा विषयोपन्यासानें त्यांनी श्रोत्यांस कधींच कंटाळा आणिला नाहीं. कौन्सिलासारख्या संस्थांमध्यें या गुणाची किती अवश्यकता आहे हें नेहमीं निदर्शनास येतें. अध्यक्षांकडून वरचेवर सूचना येऊन पुष्कळ नामदार सभासदांस आपलीं भाषणें मध्यंतरीं सोडून द्यावीं लागतात, व कौन्सिलावर त्यांचा यत्किंचितही परिणाम होत नाहीं, अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत. आपल्या इलाख्यांतील यासंबंधी अनुभव अगदीं नित्याचा आहे. प्राथमिक शिक्षणासारख्या ठरावावरील विस्तीर्ण भाषण गोपाळरावजीनीं अगदीं नियमित वेळांत संपविलें व तें संपविल्यावर कौन्सिलांतील सर्व सभासदांनीं त्यांच्या अमोघ वक्तृत्वाबद्दल त्यांची तारीफ केली. रिपोर्टरांना सुद्धां त्यांच्या भाषणाचा गोषवारा देणें फार मुष्किलीचें पडलें. नियमित वेळांत भाषण करणें हा गुण अत्यंत जरूर आहे हें गोपाळरावजी स्वतः आपल्या शिष्यवर्गास आग्रहानें सांगत असत. भाषणाचा हेतु ऐकणाराचे मनावर परिणाम करण्याचा आहे. नियमित वेळांत जर आपले विचार ऐकणारांपुढें साग्र मांडतां आले नाहींत तर आपला हेतु विफल होतो, आपण घेतलेले श्रम व्यर्थ होतात, आपल्या विद्वत्तेची किंवा ज्ञानाची मुळींच चीज होत नाहीं, असें ते वारंवार सांगत; व अनुभवावरूनही त्यांचा उपदेश

यथार्थ आहे हें कोणासही कबूल करावें लागेल. गोपाळरावजींच्या मुत्सद्दी-पणास अवश्य लागणारा **सहावा** गुण म्हणजे स्वाभिमान होय. कौन्सिलांत कोणत्याही वेळीं अपमानास्पद प्रसंग त्यांनीं सहन केले नाहींत. अशा प्रसंगीं आपला निषेध ते स्पष्टपणें प्रगट करीत असत. सिमला येथें एका वेळीं एतद्देशीय सभासदांबद्दल परलोकवासी जेंकिन्स यांनीं अपमानास्पद शब्द उच्चारले होते. गोपाळरावजींनीं त्याच बैठकींत उघडपणें या कृत्याचा निषेध केला. या वेळीं कौन्सिलांतील युरोपियन सभासदांनीं गोपाळरावांची तारीफ केली. खुद्द लॉर्ड मिंटो यांनीं जेंकिन्ससाहेबांच्या कृत्याबद्दल नापसंती व्यक्त केली, व स्वतः जेंकिन्स साहेबांस पश्चात्ताप वाटून त्यांस गोपाळरावजींची माफी मागण्याचा प्रसंग आला. आपल्या योग्यतेचा निंद्य व स्वार्थपरायण असा उपयोग गोपाळ-रावजीनीं कधीही केला नाही व कोणतीही व्यक्तिविषयक याचना केली नाहीं. स्वाभिमानाचा योग्य अर्थ म्हणजे आपला मान ठेवणें व दुसऱ्याचा राखणें. आपल्या मानाइतकीच दुसऱ्याच्या मानाची काळजी बाळगिली म्हणजे अपमानाचे प्रसंग फारच थोड्या वेळीं येतात. कौन्सिलांतील सर्व लोकांशीं ते इभ्रतीनें वागत असत. त्यांच्या आचरणानें युरोपियन अधिकाऱ्यांमध्यें इतका आदर उत्पन्न झाला होता कीं, त्यांच्या भेटीबद्दल किंवा सहवासाबद्दल पुष्कळ मोठमोठ्या इंग्रजी अधिकाऱ्यांनीं सुद्धां फार कळकळीचा आग्रह अनेक वेळां प्रगट केला होता. **सातवा** एक गुण म्हणजे टीका करतांना ते व्यक्तीवर कधींही तुटून पडत नसत किंवा अवास्तव हेतूचा प्रतिपक्षावर आरोप करीत नसत. यामुळें त्यांची टीका कधीही मर्मभेदक वाटली नाहीं. कित्येक लोकांचा प्रकार प्रतिपक्षाचा पाडाव करावयाचा म्हणजे त्याच्या व्यक्तीबद्दल भलते आरोप करावयाचे, किंवा त्याच्या हेतूबद्दल विपर्यास करावयाचा, असा असतो. Damn the man and you damn his principles या तत्वाचा अशा लोकांकडून नेहमीं अनुवाद केला जातो. गोपाळरावजींस हा प्रकार अगदीं असंमत होता. मद्रासच्या एक्झिक्युटिव कौन्सिलाचे सभासद सर हॅरोल्ड स्टुअर्ट यांनीं या बाबतींत दिलेला अभिप्राय लक्षांत ठेवण्यासारखा आहे. " Mr. Gokhale's sympathy and fairness were not created nor did they produce any flabiness of conviction. His opinions were always strongly held but held without bitterness, and this spirit of fair-

nss which was one of his mrked characteristics produced one happy effect, viz: fairness in his opponents and in many debates in which he played so successful a part there was neither bitterness nor rancour; "

## जबाबदारीची जाणीव.

**आठवा गुण** ह्मणजे जबाबदारीची तीव्र जाणीव ही होय. कोणत्याही प्रश्नाबद्दल टीका करतांना प्रतिपक्षाचे हेतु व प्रतिपक्षाच्या अडचणी या संपूर्ण लक्षांत घेऊन गोपाळराव टीका करीत असत. या योगानें प्रतिपक्षास निरुत्तर व्हावें लागे. हिंदुस्थानांतील राजकीय चळवळ करणाऱ्या वर्गास Opposition (विरुद्ध पक्ष) ह्मणण्याची चाल आहे. परंतु पार्लमेंटांतील आपोझिशन व हिंदुस्थानांतील आपोझिशन यांत महत्त्वाचा फरक आहे. पार्लमेंटांत आपोझिशन करणारा वर्ग निवडणुकीच्या हेलकाव्यामध्यें सत्ताधारी बनतो. केव्हां तरी आपल्यास सत्ता प्राप्त होणार आहे व अधिकारारूढ होऊन आपणही टीकेस पात्र होऊं ही जाणीव पार्लमेंटाच्या आपोझिशनच्या वर्गांत असते. या योगानें अशा वर्गाकडून होणारी कोणतीही टीका बेजबाबदारीची व निरंकुश होऊं शकत नाहीं. अर्थात् ती टीका योग्य मर्यादा सोडून कधींही जात नाहीं. हिंदुस्थानांतील प्रकार तसा नाही. कौन्सिलांत सरकारास विरोध करणारा वर्ग व सत्ताधारी वर्ग यांची अदलाबदल होण्याचा संभव मुळींच नाही. यामुळें सत्ताधारी वर्गाच्या अडचणी किंवा गैरसोई टीका करणाऱ्या वर्गाच्या मनांत नेहमीं जागरुक असतातच असा प्रकार होत नाहीं. या योगानें पुष्कळ वेळां शिस्तीची मर्यादा सोडून किंवा बेजबाबदारपणें टीका केली जाते. साधारण वर्तमानपत्राचें उदाहरण घेतल्यास ही गोष्ट कळून येईल. स्थानिक कलेक्टर किंवा पोलिस सुपरिंटेंडंट किंवा इतर अधिकारी यांचेवर कोणत्याही वर्तमानपत्रांत निरंकुश टीका केली जात नाहीं. कारण, अशा टीकेनें तात्काळ कानउघाडणी होण्याचा संभव असतो. परंतु हींच वर्तमानपत्रें व्हाइसरॉय, सेक्रेटरी ऑफ स्टेट किंवा प्रधानमंडळ यांचेवर पाहिजे तितकें तोंडसुख घेत असतात. कारण या अधिकाऱ्यांची व संपादकांची आजन्मांत गांठ पडण्याचा संभव असत नाहीं. परंतु या कारणामुळेंच बेजबाबदार टीका केली जावी हें मात्र अत्यंत अश्लाघ्य आहे. गोपाळरावजींनीं इंग्रजी पार्लमेंटांतील शिष्टाचाराचे नियम कधींही उलंघन केले नाहींत, व त्यामुळें बेजबाबदारपणाचा दोषही

त्यांचेवर कधीं आला नाहीं. जबाबदारीच्या टीकेपासून रागद्वेषादि विकारांनीं मनोवृत्ति क्षुब्ध न होतां टीकेकडे लक्ष देणें भाग पडतें, सात्विक मनोवृत्ति प्रज्वलित होतात,सदसद्विवेकबुद्धि जागृत होते, व टीकेचा यथार्थ परिणाम होतो. गोपाळरावजींइतकी सरकारी अधिकाऱ्यांची त्यांचेसमोर कोणीही निर्भीडपणें टीका केली नाहीं. खुद्द लॉर्ड कर्झन साहेबांशीं त्यांस चार वर्षे झगडावें लागलें. परंतु केव्हांही त्यांची टीका बेजबाबदारपणाची आहे असें त्यांचेबद्दल कोणीं विधान केलें नाहीं. लॉर्ड मिंटो साहेबांनीं त्यांचेबद्दल फार आदराचे उद्गार काढले आहेत. ते ऐकून कौन्सिलांतील कामाबद्दल उत्कृष्ट पारितोषक समजून कोणत्याही मुत्सद्द्यास धन्यता वाटली पाहिजे.

वर निर्दिष्ट केलेल्या गुणसमुच्चयाची इमारत स्वार्थत्यागाच्या भक्कम पायावर उभारली होती व यामुळें गोपाळरावजींच्या शब्दास जें महत्त्व होतें किंवा जें तेज होतें तें कोणत्याही मुत्सद्द्याच्या शब्दास किंवा कृतीस प्राप्त झालें नाहीं. वकिलीसारख्या धंद्यांत यथेच्छ पैसे मिळवून फावल्या वेळीं देशहिताबद्दल आलेला उमाळा किती उपयोगी पडणार ? किंवा ऐश्वर्यांत, संपन्नतेंत लोळत असणाऱ्या पुरुषांकडून स्वतःच्या पदराला यत्किंचितही झीज न लागतां देशोन्नतीच्या कामीं केलेली विनंति किती फलद्रूप होणार ? उलटपक्षीं, असामान्य स्वार्थत्याग करून, दारिद्र्याची कांस धरून देशाकरितां रात्रंदिवस तळमळणाऱ्या पुरुषाची विनंति निष्फल कशी होईल ? स्वार्थत्यागाशिवाय देशभक्तीस सचेतनता प्राप्त होत नाहीं. व या दोन गुणांचा संयोग झाल्याखेरीज देशाचें पाऊल कधींही पुढें पडावयाचें नाहीं. स्वार्थत्याग हें गोपाळरावजींच्या आयुष्याचें ब्रीद होतें. या गुणामुळेंच प्रांतिक पुढारी, राष्ट्रीय पुढारी व साम्राज्यांतील पुढारी, अशी त्यांची बढती होत गेली.

मुत्सद्दी होण्यास गोपाळरावजींच्या अंगीं कोणते गुण होते याचें आम्हीं येथवर वर्णन केलें. आतां मुत्सद्दी या नात्यानें गोपाळरावजींनीं केलेल्या कामगिरीचा संक्षिप्तपणें निर्देश करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

## कौन्सिलांतील कामगिरी.

गोपाळरावजींची मुत्सद्देगिरी कायदेकौन्सिलांत, विलायतेंतील लोकमत जागृत करण्यांत, दक्षिण आफ्रिकेचा लढा मिटविण्यांत, हिंदु मुसलमानांचा सलोखा वाढविण्यांत, व असंतोषाची लाट देशांत परसल्यावेळीं राजनिष्ठ तत्त्वांना

स्थिरता आणण्यांत मुख्यत्वेंकरून दिसून आली. गोपाळरावांचे गुरु न्यायमूर्ति रानडे हे १९०१ सालीं निवर्तले, व १९०२ सालीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत गोपाळरावांचा प्रवेश झाला. रुप्याच्या उतरत्या भावामुळें हुंडणावळींत फारच फरक पडत चालला होता व हिंदुस्थान सरकारला विलायतेस पाठवाव्या लागणाऱ्या पैशाचे बाबतींत पुष्कळ बचत होत होती. इकडे देशांत एकसारखे दुष्काळ पडत होते व दारिद्र्य वाढत होतें. परंतु हिंदुस्थान सरकारची गंगाजळी मात्र दिवसेंदिवस भरत होती. कार्यकारणांचा विचार न करतां अधिकारी वर्ग वाढत्या शिलकेवरून देशाची सांपत्तिक स्थिति सुधारत आहे असें म्हणत होते. या कोटिक्रमाचा पोकळपणा गोपाळरावजींनीं आपल्या पहिल्या भाषणांतच स्पष्ट करून दाखविला. शिलकेची मीमांसा बरोबर करून दरसाल पांच कोटी शिल्लक उरत असल्यामुळें, देशांतील गरीब लोकांवरील कर कमी करावा असें त्यांनीं आग्रहानें सुचविलें. या देशांतील करांपैकीं गरिबांवर पडणारे कर म्हणजे मिठावरील व प्राप्तीवरील कर हे होत. १९०३ सालीं मिठावरील कर दर मणीं २॥ रुपयांचा होता तो दोन रुपये करण्यांत आला. या वर्षीही सरकारची सांपत्तिक स्थिति चांगली असल्यामुळें हा कर आणखीही कमी करावा असें गोपाळरावजींनीं सुचविलें. प्राप्तीवरील कराची किमान मर्यादा (५०० ) पांचशेंची एक हजार (१०००) करण्यांत आली. शिक्षणाबद्दल जास्त पैसे खर्च करावे व एतद्देशीय लोकांना हुद्द्यांच्या जागा द्याव्या अशी त्यांनीं कर्झन साहेबांस विनंती केली. १९०४ साली मिठावरील कर कमी करण्यासंबंधानें त्यांनीं पुनः आग्रहाची विनंति केली. १९०५ सालीं मिठावरील कर दरमणीं आठ आण्यांनीं कमी करण्यांत आला. म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डे यांची सांपत्तिक दैन्यावस्था त्यांनीं कौन्सिलच्या नजरेस आणिली. लॉर्ड कर्झन साहेबांनीं एतद्देशीय लोकांची वरिष्ठ प्रतीच्या जागा मिळण्याची ओरड निराधार आहे असें १९०४ साली सांगितलें होतें. कर्झन साहेबांच्या कोटिक्रमांतील खोडसाळपणा गोपाळरावजींनीं सविस्तर आंकडे देऊन सर्वथैव निदर्शनास आणला. १९०६ सालीं मिठाचा कर दर मणीं एक रुपया असावा, असें त्यांनीं सुचविलें. प्राथमिक शिक्षणाबद्दल जास्त खर्च करावा, शेतकीसंबंधा सुधारणा कराव्यात, धंदेशिक्षणाबद्दल सोई वाढवाव्या व आरोग्यरक्षणाबद्दल जास्त मदत करावी, असें त्यांनीं सुचविलें. १९०७ सालीं मिठावरील कर दर मणीं एक रुपया करण्यांत आला; प्राथमिक शिक्षणावरील खर्च वाढ-

वेण्यांत आला; म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांस मदत करण्यांत आली. 'लवेच्या धोरणासंबंधीं व लष्करी खर्चाबद्दल त्यांनीं निषेध व्यक्त केला. सुधार- ोच्या योजनेसंबंधीं मिंटो साहेबांस विनंति केली. १९१० सालीं नाताळांतील ुदतबंदीचा प्रकार बंद करण्याबद्दल त्यांनीं ठराव आणला, व तो मंजूर ााला. प्राथमिक शिक्षण मोफत करण्याबद्दल ठराव आणला, व त्यांतील त्वांबद्दल सहानुभूति मिळाली. डिस्ट्रिक्ट कौन्सिल स्थापन करण्याबद्दल अगदीं वीन योजना त्यांनीं कौन्सिलपुढें मांडली. म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांचे अधिकार वाढवून त्यांस सांपत्तिकदृष्ट्या मदत करण्याबद्दल त्यांनीं सरकारास पुचविलें. गोपाळरावजींच्या प्रोत्साहनानें शिक्षण व आरोग्य या खात्यांवरील वर्च वुइल्सन साहेबांच्या कारकीर्दींत जितका झाला, तितका आजपर्यंत कोणा- च्याही कारकीर्दींत झाला नाहीं १९११ सालीं हिंदुस्थानच्या दरसालचे वाढत्या खर्चास आळा घालण्याबद्दल गोपाळरावजींनीं एक ठराव कौन्सिलपुढें आणला होता. या बाबतीत चवकशी करण्याचें सरकारनें कबूल केलें. याच सालीं ाथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करण्याबद्दल एक बिल त्यांनीं कौन्सिलपुढें सादर केलें. १९१२ सालीं या बिलाचें दुसरें वाचन होऊन तें मंजूर झालें नाहीं. तथापि या बिलांतील हेतूअन्वयें प्राथमिक शिक्षणाचा होईल तितका विस्तार करण्याचें अभिवचन खुद्द लॉर्ड हार्डिंज यांनीं दिलें आहे. याप्रमाणें सुमारें बारा वर्षें आपल्या अस्खलित वाणीनें व भारदस्त टीकेनें राज्यकार- भाराचा कल लोकछंदानुवर्ती होईल असा प्रयत्न गोपाळरावजींनी केला. त्यांनीं केलेल्या सूचनांपैकीं कांहीं प्रत्यक्ष अमलांत आल्या, कांहींची आवश्य- कता कबूल करणें सरकारास भाग पडलें, व कांहींबद्दल सरकाराकडून चवकशी चालू आहे. कौन्सिलांतील कोणत्याही सभासदास आपल्या कामाचा इतका व्यापक, इतका किफायतशीर व इतका फलप्रद आढावा लोकांपुढें मांडतां येईल असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. कौन्सिलांत असतांना अन्यायमूलक व जुल- माचे कायदे सरकार करीत असतांना, आपल्या निर्भीड टीकेनें व तडजोडीच्या उपायांनीं या कायद्याचें स्वरूप सौम्य करण्याचे कामीं गोपाळरावजींनीं किती खटपट केली हें कौन्सिलांतील सभासदांस पूर्णपणें माहीत आहे. सिडिसश मीटिंग्ज बिल, प्रेस ॲक्ट व हद्दपाऱ्या या बाबतींत लोकांच्या वतीनें गोपाळ- रावजींनीं किती प्रयत्न केले याची किंमत त्या वेळचे अधिकारी, व बाबू कृष्णकुमार मित्र यांसारखे हद्दपार केलेले गृहस्थ यांस पूर्णपणें कळलेली आहे

अशा रीतीनें मुत्सद्दी या नात्यानें आपल्यास प्राप्त झालेली थोर पद्वी कोण ताही व्यक्तिविषयक फायदा करून घेण्यांत उपयोगी न आणतां, व्यक्तीचें संस्थांचें व अखिल हिंदुस्थानांतील प्रजेचें हित करण्याकरितांच त्यांनीं तिच उपयोग केला.

लॉर्ड कर्झनसाहेबांच्या दडपशाहीमुळें उत्पन्न झालेल्या असंतोषानें लॉर्ड मिंटो यांची कारकीर्द फारच अस्वस्थतेची होती. या आणीबाणीच्य प्रसंगी गोपाळरावजींनीं किती उत्कृष्ट कामगिरी केली याबद्दल लॉर्ड मिंटो यांचे उद्गार चिरस्मरणीय आहेत.

"I value immensely the words to which I have listened here and which have emanated on your behalf from the distinguished Indian statesman (Mr. Gokhale) with whom I have had the honour to serve during the years I have been in India, to whom I have listened in the Imperial Legislative Council and to whom I am deeply indebted for the counsel and advice which he has so readily given and than whom no one was more capable of representing the interests of this country."

*Lord Minto in Bombay.*

कौन्सिलांतील कामगिरीबद्दल इतकी प्रशंसा आजपर्यंत कोणत्याही हिंदी मुत्सद्द्याची बादशहांच्या प्रतिनिधीकडून झालेली नाही.

## इंग्लंडांतील चळवळ.

मुत्सद्देगिरीची दुसरी बाबद म्हणजे विलायतेंतील लोकमताबद्दलची चळवळ ही होय. हिंदुस्थानांतील प्रमुख राजसत्ता सिव्हिल सर्व्हिसचे हातीं आहे. सिव्हिल सर्व्हिस ही एक विशिष्ट जातच बनली आहे. हिंदुस्थानांतील लोकांना सुराज्याचे किंवा स्वराज्याचे हक्क देणें म्हणजे आपले हक्क कमी करून घेणें अशी या वर्गाची ठाम समजूत आहे. विलायतेंतील सामान्य जनता ( Democracy ) किंवा लिबरल पक्षांतील पुढारी यांची अशी समजूत नाहीं. स्वराज्य देण्याबद्दल जरी आज पुष्कळ मतभेद असला तरी हिंदुस्थानांत **सुराज्य** असावें याबद्दल एक मत

आहे. हिंदुस्थानांत अधिकारी वर्गानें अन्याय केल्यास इंग्लंडांतील समंजस लोकांस चीड येते. हिंदुस्थानच्या अवनतीचें चित्र त्यांचेपुढें मांडल्यास त्यांस शरम वाटते. हिंदुस्थानांतील लोकांस स्वराज्याचे हक्क हळुहळु देणें अवश्य असून हें इंग्लडचें एक आद्य कर्तव्य आहे असें मानणाऱ्या कांहीं थोर मुत्सद्द्यांचा तेथें एक वर्ग आहे. अशा सर्व लोकांची सहानुभूति हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेबद्दल मिळवावी व येथील सत्ताधारी वर्गावर या सहानुभूतीचें वजन आणून राज्यकारभाराचें धोरण शक्य तितकें प्रजेच्या हिताचें करावें असें मानणारा हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांत एक मोठा वर्ग आहे. इंग्लंडांत हिंदुस्थानच्या हिताबद्दल चळवळ करणें ह्मणजे कालाचा, बुद्धिमत्तेचा व द्रव्याचा व्यय करण्यासारखें आहे, व वेशीवर आपलें दुःख टांगण्यासारखा हा प्रयत्न हास्यास्पद आहे, असें मानणारा दुसरा एक वर्ग आहे. गोपाळराव पहिल्या वर्गापैकीं होते. त्यांनीं इंग्लंडांतील चळवळीची उपयुक्तता आपल्या प्रयत्नांनीं प्रत्यक्षपणें सिद्ध केली आहे. इंग्लंडांत हिंदुस्थानाबद्दल अतिशय अज्ञान आहे, व याच साठीं तेथें एक ब्रिटिश कॉंग्रेस कमेटी स्थापन झाली असून तिच्या विद्यमानें **इंडिया** हें वर्तमानपत्र नियत असतें. हिंदुस्थानांतील प्रचलित विषयांची माहिती ‘ इंडिया ’ पत्रांत छापून तिचा प्रसार पार्लमेंटांतील सभासदांमध्यें करणें, सभांच्या व व्याख्यानांच्या द्वारें हिंदुस्थानांतील उणिवा ब्रिटिश जनतेस समजून देणें, व पार्लमेंटांतील उदारमनस्क प्रतिनिधींकडून हिंदुस्थानांतील अन्यायाबद्दल मंत्रिमंडळांस प्रश्न विचारणें, याप्रमाणें बरींच कामें ब्रिटिश कॉंग्रेस कमेटी करीत असते. परंतु या चळवळीस पैशाचें मोठें साहाय्य लागतें; येथील लोकांनीं सढळ हातानें मदत केल्याखेरीज ही चळवळ यशस्वी होण्याचा बिलकुल संभव नाहीं. इंडिया पत्रास वर्गणीदार मिळण्याची मोठी मुष्किल पडते. आज सुमारें दहा वर्षे गोपाळरावजींनीं हें काम आपल्या अंगावर घेऊन इंडिया पत्रास वर्गणीदार जमविण्याचा प्रयत्न चालविलेला आहे. गोपाळरावांच्या मदतीखेरीज हें पत्र केव्हांच बंद पडलें असतें. या पत्राच्या पुष्कळ प्रती पार्लमेंटाच्या सभासदांस मोफत वांटण्यांत येतात. या पत्रांत हिंदुस्थानासंबंधीं असलेली माहिती येथील लोकांस शिळी वाटते. इंग्लंडांतील बातमी दैनिक पत्रांतून पूर्वींच कळते, म्हणून वर्तमानपत्र या नात्यानें त्यास येथें कोणी वर्गणीदार मिळत नाहींत. परंतु ब्रिटिश कांग्रेस कमेटीला मदत करण्यासाठीं म्हणून प्रत्येक देशाभिमानी मनुष्यानें या पत्रास मदत करणें अवश्य आहे इतकी कळकळ फारच

थोड्या लोकांत जागृत आहे. याचसाठीं गोपाळरावजींस आपल्या सोसायटींतील मेंबर निरनिराळ्या प्रांतांत पाठवून इंडियां पत्रास वर्गणीदार मिळवून हें पत्र जिवंत ठेवणें भाग पडलें. या कामगिरीचें महत्व इंग्लंडांतील चळवळीच्या पुरस्कर्त्यांस सहज कळून येणार आहे. इंग्लंडांतील जनतेला इकडील लोकस्थिति निवेदन करण्याकरितां गोपाळराव १९०५ व १९०६ या दोन सालीं विलायतेला गेले होते. १९०५ सालची त्यांची मोहीम अत्यंत यशस्वी झाली व त्यांचें सर्वत्र अभिनंदन झालें. १९०६ सालींही लिबरल मुत्सद्द्यांची व नामांकित राजकारणी पुरुषांची मुलाखत घेऊन कौन्सिलची सुधारणा व राज्यव्यवस्थेंत लोकमतास अवसर मिळण्याची आवश्यकता त्यांनीं फार जोरदारपणें प्रतिपादन केली. १९०८ साली इंग्लंडांत जाऊन लॉर्ड मोर्ले साहेबांच्या पुष्कळ मुलाखती घेऊन सुधारणेच्या वेळीं येथील राज्यव्यवस्थेचें आकुंचित स्वरूप लॉर्ड मोर्ले यांचेपुढें फार व्यवस्थितपणें त्यांनीं मांडलें. सुधारणांच्या योजनेमध्यें गोपाळरावजींचें कितपत साहाय्य होतें हें लॉर्ड मोर्ले साहेबच सांगू शकतील. या संबंधाचा इतिहास अद्याप गुप्त आहे. लॉर्ड रे साहेबांचे यासंबंधीं उद्गार फार महत्त्वाचे आहेतः—

"If Lord Morley were at that meeting he would testify as to the great assistance derived in elaborating his plans from the advice he obtained from Mr. Gokhale And that advice was always given on practical lines."

खुद्द लार्ड हार्डिंज यांनींहीं असेच उद्गार काढले आहेत. पुष्कळ इंग्लिश पत्रांनीही गोपाळरावजीच्या या कामगिरीबद्दल फारच प्रशंसा केली होती. मोर्ले साहेबांच्या सुधारणा म्हणजे भावी उन्नतीचा पाया आहे. राणी सरकारच्या जाहीरनाम्यास जर मूर्तिमंत स्वरूप अंशतः प्राप्त झालें असेल तर तें लॉर्ड मोर्ले यांच्या एक्झिक्युटिव कौंसिलांतील व इंडिया कौंसिलांतील एतद्देशीयांच्या नेमणुकीनेंच होय. राजकीय प्रश्नाबद्दल वादविवाद करण्याची परवानगी व बजेटावरील व्यापक टीकेची मुभा या दोन सुधारणांनीं प्रजापक्षाचे हक्क फारच वाढले आहेत. या दोन्ही सुधारणांत गोपाळरावांचा हात स्पष्टपणें दिसत आहे. या सुधारणांच्या योगानें गुप्त चाललेला सत्ताधारी वर्गाचा ( Beaurocracy ) राज्यकारभार उघड दरबारांत येऊं लागला. याबद्दल चर्चा करण्यास सुरवात झाल्यानें आपल्या कृत्याचें समर्थन करणें सत्ताधारी वर्गास भाग पडत आहे. अन्यायाच्या गोष्टींचें उघड समर्थन करतांना मनुष्य कितीही अधिकारांध

असला तरी नैतिक ओशाळगत त्यास पदोपदीं वाटत असते; सदसद्विवेक-बुद्धीची पुष्कळ जाचणी अंतःकरणास सोसावी लागते. याचा परिणाम अन्यायाकडील प्रवृत्ति नाहींशी करण्याकडेसच होतो. लोकपक्षाकडून कौंसिलपुढें येणारे ठराव नामंजूर करण्याचा अधिकार यद्यपि हल्लींच्या व्यवस्थेनें व्हाइसरॉयांस दिलेला आहे, तथापि हा अधिकार पदोपदीं चालविणें नैतिक दृष्ट्या अशक्य होईल. नवीन सुधारलेल्या कौंसिलांत लोकपक्षाच्या पुढाऱ्यास किती उपयुक्त कामगिरी करतां येते, समंजस गोष्टी करण्यास सरकारास कसें भाग पाडतां येतें याचा उत्तम अनुभव गोपाळरावजींच्या सुधारलेल्या कौंसिलांतील चार वर्षांच्या कामगिरीवरून मूर्तिमंतपणें दिसून येणार आहे. गोपाळरावांच्या अभावीं वरिष्ट कायदेकौंसिलांत किंवा प्रांतिक कौंसिलांत सुधारणेच्या योजनेंचें स्वरूप लोकांपुढें योग्य प्रकारें न आल्यास तो दोष नामदार सभासदांचा आहे; सुधारलेल्या कौंसिलाचा नाहीं. कित्येक अहंमन्य लोकांनीं या योजनेस टोणग्याचे अचळ अशीं उपहासात्मक नांवें दिलीं. धार काढण्याची अक्कल नसलेल्या मनुष्यास कौन्सिलची धेनु टोणग्याप्रमाणेंच वाटणार, परंतु कुशल मनुष्यास ही कामधेनु नसली तरी इजपासून पुष्कळ दुग्धप्राप्ति होते असें स्पष्टपणें अनुभवास येत आहे. सुधारणेच्या योगानें लोकसत्ताक राज्यपद्धतीचें बीजारोपण झालें आहे; गोपाळरावजीची इंग्लंडांतील खटपट ही या महत्त्वाच्या सुधारणेस पुष्कळ अंशीं कारणीभूत झाली आहे. १९१२ सालीं गोपाळराव विलायतेस गेले होते, व त्यावेळी प्राथमिक शिक्षणाच्या बाबतींत इंग्लंडांतील सत्ताधारी वर्गाची सहानुभूति त्यांनी मिळविली व दक्षिण आफ्रिकेंतील प्रश्नाबद्दलही मंत्रिमंडळांतील प्रमुख मुत्सद्द्यांचें साह्य मिळविलें. कलोनियल ऑफिसच्या आग्रहावरूनच दक्षिण आफ्रिकेंत जाण्याचें त्यांनीं मुक्रर केलें. गोपाळरावजींस रॉयल कमिशनवर याच वेळीं नेमण्यांत आलें होतें. इतक्या वर्षांच्या इंग्लंडांतील चळवळीमुळें इंग्लंडांतील प्रमुख राजकारणी पुरुषांना वर्तमानपत्रांच्या संपादकांना गोपाळरावजी चांगलेच परिचयाचे झाले होते. कांसरव्हेटिव पक्षांतील लोक सुद्धां त्यांची मुलाखत घेत. हिंदुस्थानविषयक प्रश्नाबद्दल त्यांचीं मतें कौतुकानें ऐकत. त्यांच्या शब्दास सर्वत्र अत्यंत मान मिळूं लागला. साम्राज्यांतील एक मुत्सद्दी या नात्यानें त्यांची गणना होऊं लागली. सन १९१३ व १९१४ या दोन्ही सालीं पब्लिक सर्व्हिसच्या कामानिमित्त ते विलायतेस गेले होते व हिंदुस्थानच्या प्रश्नाबद्दल तेथील मुत्सद्द्यांना व अधिकारिवर्गाला वस्तुस्थितीचें

यथार्थ ज्ञान देण्याचा त्यांनीं क्रम चालू ठेविला होता. हिंदुस्थानांतील लोकमताला शक्य तितका पाठिंबा शक्य तितक्या प्रयत्नांनीं विलायतेंतील मुत्सद्द्यांकडून मिळविण्याचा गोपाळरावांनीं सतत प्रयत्न केला. सर वुइल्यम वेडर्नबर्नसारख्या हिंदुस्थानच्या निस्सीम व कळवळ्याच्या हितचिंतकास त्यांनीं पराकाष्ठेचें प्रोत्साहन दिलें. इंग्लंडांतील चळवळीची उपयुक्तता, टीकाकारांचीं तोंडें बंद करून, स्पष्टपणें लोकांच्या निदर्शनास आणिली. गोपाळरावांच्या अकालनिधनानें जो सर्वांत मोठा तोटा झाला आहे तो या चळवळीचा आधारस्तंभच नाहींसा झाला, हा होय.

हिंदुस्थानचे माजी अंडरसेक्रेटरी मि. मॉंटेग यांनीं गोपाळरावजींबद्दल काढलेले उद्गार त्यांच्या थोरवीची साक्ष पटवीत आहेत.

"That a man should interest himself in the complexities of Indian economics and finance is in itself a tribute to his powers of mind; that he should master them and should display his mastery at an age at which few people would care ever to study them cursorily, was a sign of a ripening intellect and a serious endeavour which served to lay the sure foundations of Mr. Gokhale's work. And with all his comprehensiveness of judgment and mental clarity he never dropped into the academic fallacy of contempt. He impressed one as being among the most candid and unassuming of men and he was equally ready to give or to take advice where it seemed most serviceable. His mind possessed the qualities ascribed to statesmanship without ever losing the fire of its enthusiasm or its warm human interests. We feel that his loss touches deeply not only India but the empire and the whole world of men, whose thoughts move in harmony whether they know or not, with the spirit of the brotherhood of "the Servants In dia."

*The Right Hon. Montague, M. P.*

या चळवळीप्रीत्यर्थ हिंदुस्थानांतील प्रयत्न करणाऱ्या लोकांस गोपाळरावां-इतकें कोणासच यश आलें नाहीं. निश्चयानें या बाबतीत कोणी प्रयत्न केला नाहीं. ज्या आस्थेनें व श्रद्धेनें या चळवळीविषयीं खटपट करावयास पाहिजे होती, तशी कोणींच केली नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते, ब्रिटिश कांग्रेस कमिटीला दरसाल देऊं केलेली रक्कम कोणत्याही प्रांतांतून एक वर्षी सुद्धां संपूर्णपणें पोंचली नाहीं. या बाबतीतील ब्रिटिश कांग्रेस कमिटीची कहाणी अत्यंत निराशाजनक आहे. अशा स्थितींत खऱ्या कळकळीचा पुरस्कर्ता गेल्यामुळें त्या संस्थेचें किती नुकसान झालें आहे हें पदोपदीं अनुभवास येणार आहे.

## दक्षिण आफ्रिकेचा लढा.

तिसरी मुत्सद्देगिरीची बाबत म्हणजे दक्षिण आफ्रिकेंतील लढा होय. दक्षिण आफ्रिकेंत गेलेल्या हिंदी मजुरांना व स्वतंत्र व्यापाऱ्यांना किती त्रास व किती अडचणी सोसाव्या लागल्या यासंबंधाची हकीकत पूर्वीं प्रसिद्ध झाली आहे. तिचा विस्तार येथें करण्यास सवड नाहीं. दक्षिण आफ्रिकेतील हिंदी लोकांस शक्य त्या मार्गानें घालवून देण्याचें वसाहतींतील सरकारानें ठरविलें होतें. साम्राज्याचे आपण घटक असल्यामुळें वसाहतींत अनिरुद्ध प्रवेश करण्याचा आपला हक्क आहे असें हिंदी लोकांचें म्हणणें आहे. वसाहतींतील सरकारचें म्हणणें, पुष्कळ पैसा खर्च करून व माणसें खर्ची घालून वसाहतींत आपण राज्य स्थापन केलें आहे, अशा स्थितींत पाहिजे त्या मनुष्यास वसाह-तींत येऊं दिल्यास मूळ संस्थापकांना निर्वाहाची पंचाईत पडेल. शिवाय हिंदी लोक मितव्ययानें राहून कामांत कुशल असल्यामुळें धंद्यांचे चढाओढींत त्यांस वर्चस्व मिळेल व आपल्या पोटावर पाय येतील अशी त्यांस स्वाभाविक भीति वाटत आहे. उलटपक्षीं वसाहतींची सांपत्तिक स्थिति सुधारण्यास मुदतबंदीच्या हिंदी मजुरांनीं मदत केल्यामुळें वसाहतीस महत्त्व प्राप्त झालें आहे. मुदतबंदीच्या कराराचे वेळेस कराराची मुदत संपल्यानंतर स्वतंत्र नागरिक या नात्यानें वसाहतींत राहण्याचा आपला हक्क आहे व या हक्कान्वयें आपल्या समाजाच्या प्रगतीकरितां अवश्य लागणारे लोक म्हणजे शिक्षक, वैद्य, धर्मोपदेशक, व्यापारी, वगैरेंची आपल्या समाजाचे अस्तित्वास जरूर आहे; अशा लोकांस वसाहतीत अवश्य येऊं दिलें पाहिजे, अशी हिंदी लोकांची बाजू आहे. देशभक्त गांधी यांनी जी अवर्णनीय सत्याग्रहाची चळवळ लोकोत्तर स्वार्थत्यागानें यशस्वी केली

त्यांनींच बलाबलाचा विचार करून कांहीं तडजोड सुचविली होती. कायद्याच्या शब्दाप्रमाणेंच ब्रिटिश साम्राज्यांतील प्रजाजन या नात्यानें साम्राज्याखालील कोणत्याही भागांत प्रवेश करण्यास जरी मुभा असली तरी व्यवहारामध्यें या सवलतीचा उपयोग होत नाहीं. यासाठीं वसाहतींत अनिरुद्ध प्रवेश करण्याची हांव सोडून कांहीं मर्यादित लोकांना दरसाल वसाहतींत येऊं देण्याची परवानगी असावी, व जातिविशिष्ट कायदे स्वाभिमानास व साम्राज्याच्या इभ्रतीस अपमानकारक असल्यामुळें ते रद्द करावे, असें सुचविण्यांत आलें. गोपाळराव या वेळीं इंग्लंडांत होते. हारकोर्ट व लॉर्ड ग्लॅडस्टन यांच्या त्यांनीं मुलाखती घेतल्या या सर्वांनीं गोपाळरावांस स्वतः दक्षिण आफ्रिकेंत जाऊन तेथील सरकारापुढें तडजोडीनें या प्रश्नाचा निकाल लावावा असें आग्रहानें सुचविलें. साउथ आफ्रिकेंतील सरकारनें आपल्यास शिष्टसंप्रदायाप्रमाणें वागविलें तर आपण तडजोडीची खटपट करूं. याप्रमाणें वाटाघाट होऊन गोपाळरावांनीं आफ्रिकेंत जाण्याचें ठरविलें. अगदीं निघण्यापासून त्यांस एकसारख्या अडचणी येऊं लागल्या. पहिली अडचण आगबोटीवरील तिकिटाची आली. विलायतेहून दक्षिण आफ्रिकेंत जाणाऱ्या बोटींवर सहसा एशिआटिक मनुष्यास घ्यावयाचें नाहीं, पहिल्या वर्गांतून तो प्रवास करतो म्हणालाच तर सुतक्याप्रमाणें त्यास एक खोली ( cabin ) देऊन तिचें संपूर्ण भाडें अशा एकट्या मनुष्याकडून घ्यावयाचें, अंत्यजाप्रमाणें त्यास अपमानानें वागवावयाचें, असा सर्रहा क्रम होता. यापूर्वीं तो पुष्कळ हिंदी लोकांना सोसावा लागला होता. गोपाळरावांनाही प्रथमतः याचप्रमाणें तिकिटाच्या बाबतींत कळविण्यांत आलें. फर्स्टक्लासचें एकच तिकीट घेऊन प्रवास करण्याचा आपला हक्क आहे व सबंध केबिनचें भाडें आपण देणार नाहीं, अशी त्यांनीं तक्रार केली. या बाबतींत दाद न लागल्यास बोटीच्या कंपनीविरुद्ध आपल्यास कायदेशीर दाद मागून घ्यावी लागेल असेंही त्यांनीं कळवलें. या चळवळीचा परिणाम एकाच तिकिटावर प्रवास करण्याची त्यांस परवानगी मिळाली. आगबोटींवर सुद्धां एतद्देशीय प्रवाशांना अंत्यजाप्रमाणें वागविलें जातें. बोटींवरील सर्व प्रवाशांच्या जेवणाच्या खेळण्याच्या वगैरे ज्या जागा आहेत त्यांत एशिआटिकांना जाण्याची परवानगी नसते. अगदीं अपंक्त मनुष्याप्रमाणें एका बाजूस बसवून त्यांस वाढण्यांत येतें, असा अनुभव दे. गांधी वगैरेंना पूर्वींच आला होता. गोपाळरावांनाही तीच स्थिति अनुभवावी लागणार असें वाटत होतें. जेवणाचे वेळीं त्यांनीं बोटीवरील

वाढण्याला आपली जागा कोठें आहे असें विचारलें. चौकशींअंतीं असें दिसून आलें कीं, गोपाळरावांची जागा सर्व प्रवाशांच्या मध्यभागीं कॅप्टनच्याजवळ राखून ठेविली आहे. कॅप्टनच्याजवळ जेवणास बसण्याचा मान सामान्य प्रवाशास केव्हांही मिळत नाहीं. अगदीं सन्माननीय पाहुण्याकरितांच हा मान राखून ठेवलेला असतो. अशा रीतीनें सुरवात झाल्यावर बोटीवर सर्व युरोपियन स्त्रीपुरुषांनीं त्यांचें कौतुकानें स्वागत केलें. त्यांचा प्रवास फार सुखकर झाला. बोटीवरून उतरण्याबरोबर आंगठा उठवून देण्याची व इंग्रजी भाषेची परीक्षा देण्याची अपमानास्पद पाळी येते कीं काय, ही भीतीही गोपाळरावांस वाटत होती. परंतु दक्षिण आफ्रिकेच्या किनाऱ्यास बोट लागतांच एक गृहस्थ पत्र घेऊन गोपाळरावांची चौकशी करीत आले. पत्र पाहतां युनिअन सरकारचे हे सेक्रेटरी असून प्रधानमंडळाच्या वतीनें गोपाळरावांचें स्वागत करण्याकरितां आले होते. प्रधानमंडळाकडून शक्य त्या तऱ्हेनें आदरातिथ्य करण्याचें त्या पत्रांत दर्शविलें होतें. दक्षिण आफ्रिकेंत उतरल्याबरोबर एकाद्या प्रधानाप्रमाणें गोपाळरावांचें स्वागत सुरू झालें. प्रधानमंडळाकरितां राखून ठेवलेला स्पेशल सलून, एक सेक्रेटरी, एक निष्णात स्वैंपाकी, अशा जय्यत तयारीनें दक्षिण आफ्रिकेंतील प्रवासास आरंभ झाला. युरोपिअन लोकांनीं त्यांचें स्वागत केलें. एशिआटिक लोकांनीं तर गोपाळरावांचें आगमन सणाप्रमाणें पाळलें. प्रचंड सभा भरल्या. मौल्यवान् मानपत्रें अर्पण करण्यांत आलीं. साउथ आफ्रिकेच्या गव्हर्नर जनरलनीं सन्मान केला. प्रधानमंडळापुढें खुल्या दिलानें गोपाळरावांनीं आपलें म्हणणें मांडलें. राजकारणाची ( Politics ) व्याख्या लार्ड मोर्ले साहेबांनीं एके ठिकाणीं तडजोडी परंपरा ‘ politics is a series of compromises ’ अशी केली आहे; व ही अक्षरशः गोपाळरावांच्या प्रत्येक कृत्यास लागू पडते. तडजोड हेंच त्यांच्या मुत्सद्दीगिरीचें रहस्य होतें. परिस्थिति शक्यता, बलाबल या सर्वांचा विचार करून साध्य शक्य—असेल तें पत्करावें, व दुस्साध्य गोष्टीबद्दल आग्रह सोडावा व शक्य त्या मार्गानें आपलें पाऊल पुढें टाकावें, हें गोपाळरावांचें व्रत होतें. लार्ड क्र्यू यांनीं गोपाळराव मोठे समय

साधक होते * असें त्यांचें यथार्थ वर्णन केलें आहे, व हें किती मार्मिक आहे. हें कोणासही सहज दिसून येणार आहे. युनिअन सरकारच्या वाटाघाटींत तीन पौंडांची अत्यंत जुलुमाची डोईपट्टी बहुतेक नाहींशी करण्याचें गोपाळरावांस अभिवचन मिळालें, व हिंदी लोकांचा लढा शक्य त्या मार्गांनीं संपविण्याचें गोपाळरावांस प्रधानमंडळानें आश्वासन दिलें. अशाप्रकारें सर्वत्र उत्सव होत असतांना सुमारें एक महिन्यापर्यंतचा हा काल गोपाळरावांस फारच कठिण गेला-

## आफ्रिकेंतील मुत्सद्देगिरी.

गोपाळराव दक्षिण आफ्रिकेंत मुत्सद्दी या नात्यानें व्यावहारिक तडजोड करण्यासाठीं गेले होते. उभय पक्षांकडून, म्हणजे डच लोक व हिंदी लोक यांचें कडून, त्यांचें स्वागत होत होतें. अशा वेळीं कोणत्याही बाजूनें एकही अनुदार शब्द उच्चारणें म्हणजे एका बाजूची सर्वथैव नामर्जी संपादन करणें होतें; व अशा अप्रयोजक कृत्यानें या महोत्सवाचा रसभंग झाला असता. हिंदी लोकांची यत्किंचितही नाउमेद होऊं न देतां स्वाभिमानान तरफदारी करणें व युनिअन सरकारपुढें व डच लोकांपुढें समतोलपणानें न्यायाची बाजू ठेवणें हें दुरापास्त काम होतें. गोपाळरावजींनीच या प्रसंगाचें वर्णन फार बहारीचें केलें आहे व तें चिंतनीय आहे. मुत्सद्देगिरीचा कस लागण्याचा यापेक्षां दुसरा प्रसंग कोणताच नव्हता. गोपाळरावांच्या मुत्सद्देगिरीची खरी परीक्षा याच वेळीं झाली.

" The first is about the extreme difficulty of my position in South Africa. Never before in all my life, I assure you, had I to walk on such difficult & delicate ground, nor did I ever feel so oppressed with a sense of res-

---

* " In the good sense of the word Mr. Gokhale was an opportunist. No doubt he dreamed dreams and saw visions as most public men with high hopes and broad views did, but he was certainly one of those who knew how to take occasion by the hand and make the bounds of freedom wider yet. "

ponsibility as during my four weeks in South Africa. Even the special courtesy and consideration shown to me by the Union Government while it undoubtedly facilitated my work added in a way to my difficulties; for, while one section of the European community, the extrem eanti-Indian section, was resentful that such consideration should have been shown to me, those who represented the better European mind, though satisfied at heart that the right thing had been done, were nervous as to whether undue advantage might be taken of the position to put a forced interpretation on what had been done. On the Indian side, on the other hand, the feeling in the matter was one of rather excessive jubilation; in such circumstances, a thoughtless act or even an unguarded expression, not only on my part but on the part of any one of our countrymen there--and they were meeting me daily in most enthusiastic demonstration--might have resulted in serious unpleasantness and embarrassment all round, inflicting an injury on the cause, difficult soon to remedy.

" Throughout my four weeks, the dread of this possibility never left me for a moment and constantly weighed me down, and I thank God here to-day, speaking in your midst, as I did at Pretoria on the occasion of my last speech in South Africa, that no untoward incident marred the smooth progress of my visit and that even if no actual good, results from my labours there, at any rate I am happy to feel that I have done no harm."

हिंदी लोकांनीं मानपत्रें देऊन व युनिअन सरकारच्या प्रधानमंडळानें आनंद प्रदर्शित करून या गोष्टीस आपली कबूली दिली आहे. सर व्हॅलंटाइन चिरोल यांचे यासंबंधीं उद्गार फार महत्वाचे आहेत:--

" I can testify from letters, which I in turn received from my own friends out there, how largely Mr. Gokhale

contributed to remove many previous misconceptions by his unfailing tact and statesmanlike moderation and to pave the way for the settlement which ultimately ensued though only after a further deplorable crisis that might have been altogether avoided had his wise counsels at once prevailed."

गोपाळराव स्वदेशीं परत आले. यानंतरही हिंदी लोकांच्या प्रश्नाबद्दल वसाहतींतील डच लोकमत फार प्रतिकूल होतें. प्रधानमंडळाच्या तडजोडीस सुद्धां भीक घालावयाची नाहीं अशी तेथील विरोधी पक्षाची चळवळ चालू झाली. दे. भ. गांधी यांना आपलें सत्याग्रहाचें व्रत जोरानें चालविणें भाग पडलें. साउथ आफ्रिकेंत पुनः एकच बखेडा माजून गेला. हजारों हिंदी स्त्रीपुरुष या चळवळीच्या पायीं आपल्या जिवाची सुद्धां आहुती देण्यास दे. भ. गांधीं यांच्या नेतृत्वाखालीं तयार झाली. अशा प्रचंड स्वार्थत्यागाच्या चळवळीस द्रव्यसाहाय्याची नड फारच भासं लागली. गोपाळरावांनीं जरूर ते पैसे पुरविण्याचें दे. भ. गांधी यांस वचन दिलें. आपल्या लोकोत्तर वजनानें या फंडासाठीं पैसे मिळविण्याची त्यांनीं पराकाष्टा केली. गांधी यांस दरमहा २००० पौंड म्हणजे ३०००० रुपये पाठविण्याचें त्यांनीं कबूल केलें होतें. पहिल्या महिन्यास ३००००रुपये वर्गणीचे रोख वसूल झाले नाहींत. ही रक्कम गोपाळरावांनीं आपल्या पदरची भरली व आपल्या बोलण्यांतलि खरेपणा गांधी यांच्या प्रत्ययास आणून दिला. सतत परिश्रमानें सुमारें पांच लक्ष रुपये गोळा केले. त्याचप्रमाणें व्हाइसरॉय साहेबांची गांठ घेऊन त्यांची शक्य ती मदत गोपाळरावांनीं मिळविली. लॉर्ड हार्डिंज व गोपाळराव यांच्या दरम्यान या बाबतींत जो पत्रव्यवहार झाला आहे तो अद्याप प्रसिद्ध झालेला नाहीं. व्हाइसरॉय साहेबांस गोपाळरावजींची किती मदत झाली हें खुद्द लार्ड हार्डिंज यांनीं प्रांजल अंतःकरणानें व्यक्त केलें आहे.

"It was also right that on this occasion reference should be made to the important part taken by Mr. Gokhale in emigration questions and in particular that leading to Indian emigration to South Africa. In this question, as in all other political questions, Mr. Gokhale strove ceaselessly for the amelioration of the conditions

of Indians and for the promotion of their welfare. It was largely due to him and his tactful and statesmanlike attitude during his visit to South Africa that this thorny question has eventually received a satisfactory solution... ........................On more than one occasion he hab given advice which he found to be both sound and useful, and he might mention that in the South African emigration question he rendered most loyal and helpful assistance."

गोपाळरावजींच्या मुत्सद्देगिरीबद्दल याहून दुसऱ्या पुराव्याची आवश्यकता नाहीं. साउथ आफ्रिकेच्या बाबतींत अंशतः तरी समाधानकारक निकाल गोपाळरावांचे हयातींत झाला ही आनंदाची गोष्ट आहे. या प्रश्नचा खरा व चिरतन असा निकाल गोपाळरावांनीं म्हटल्याप्रमाणें या देशाच्या उन्नतीवरच अवलंबून आहे. हिंदुस्थानच्या ऊर्जित दशेबरोबरच वसाहतींतील लोकांना स्वाभिमानानें व साम्राज्याचे प्रजाजन या नात्यानें वसाहतींत राहतां येईल हेंही निर्विवाद आहे.

## हिंदूमुसलमानांचा प्रश्न.

त्यांच्या मुत्सद्दगिरीची चवथी बाबत म्हणजे हिंदुमुसलमानांचा प्रश्न ही होय. या बाबतींत गोपाळरावांचे विचार फार प्रगल्भ होते. आगगाड्या, तारायंत्रें, भाषा, राज्यव्यवस्था या योगानें एक झालेल्या हिंदुस्थानांतील तीस कोटी प्रजेमध्यें परस्परांतील यादवी ही परिस्थिति राजसत्तेपेक्षां उन्नतीस जास्त विघातक आहे असें गोपाळरावांचें ठाम मत होतें. हिंदुस्थानच्या कोणत्याही प्रश्नाच्या बाबतींत प्रजाजनांनीं आपण आर्यमातेचे पुत्र आहोंत या भावनेस अग्रस्थान दिलें पाहिजे, जातिविषयक किंवा धर्मविषयक भेदाला बिलकुल अवसर देतां कामा नये, असें त्यांचें ब्रीद होतें. अल्पसंख्याक दृष्टीनें कोणत्याही समाजास अवश्य त्या सवलती दिल्या पाहिजेत असें गोपाळराव नेहमीं म्हणत. परंतु जरी न्यायाच्या दृष्टीनें अशा सवलती अवश्य आहेत व व्यवहारांत उपयुक्त आहेत, तरी देशोन्नतीच्या दृष्टीनें अल्पसंख्याकांनीसुद्धां आपल्या राजकीय आकांक्षांमध्यें आपण हिंदुस्थानचे रहिवाशी आहों ही जाणीव सदैव लक्षांत ठेविली पाहिजे असें ते आग्रहानें सांगत असत. या तत्वामुळेंच गोपाळराव हे मुसलमानसमाजास आदरणीय

झाले होते. लखनौ, अलीगड यांसारख्या आदिपीठांचे ठिकाणीं त्यांचा मुसलमानवर्गाकडून जो सन्मान झाला, व त्यांच्या निधनानंतर निजाम हैद्राबादसारख्या मुसलमानी रियासतींतही त्यांच्या स्मारकाबद्दल जी चळवळ सुरू आहे, त्यावरून मुसलमान बंधूना गोपाळरावांबद्दल किती आदर वाटत होता, हे स्पष्ट दिसून येणार आहे. हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांमध्यें हिंदु व मुसलमान या दोन्ही समाजांना सन्माननीय असा हिंदी पुढारी दुसरा कोणताही नव्हता असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्या पुढाऱ्यांना राष्ट्रीय हें वरील विशेषण गुणाखेरीज लावतां येईल असें आम्हांस वाटत नाहीं. मॉस्लेम लीगच्या चळवळीस उत्तेजन देण्यामध्यें व अल्पसंख्याक या दृष्टीनें सरकारकडून दाखविण्यांत येणाऱ्या विषमतेची तीव्रता कमी करण्यामध्यें गोपाळरावांनीं शिकस्तीचे प्रयत्न केले. गोपाळरावांच्या योग्यतेचें यथार्थ व मार्मिक परीक्षण ना० आगाखान यांच्यासारखें दुसऱ्या कोणत्याही मुत्सद्द्याकडून आतांपर्यंत झालेलें नाहीं.

## पक्षभेद.

या देशाच्या रोगाचें गोपाळरावजींचें निदान फार यथार्थ होतें; व तदनुरोधानेंच उपाययोजनाही बिनचुक चालू होती. रोगाची चिकित्सा बरोबर झाल्याखेरीज औषधाची योजनाही हितावह होत नाहीं, हल्लीं आपल्या समाजांत राजकीय बाबतीत जे पक्षभेद उत्पन्न जाहले आहेत त्यांचें मूळही ह्या निदानांतच आहे; व यासाठीं या निदानाचें स्वरूप स्पष्टपणें समजून घेतल्याखेरीज उपाययोजनेचें महत्व लक्षांत येणार नाही.

एका पक्षाचें म्हणणें असें आहे कीं, हल्लींच्या हीन स्थितीचें परकी सत्ता हेंच सर्वस्वी कारण आहे. स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज आपलें दैन्य नाहीसें होण्यास दुसरें कोणतेंही साधन नाहीं. परकी सत्ता फार थोड्या लोकांच्या हातीं आहे. अवघ्या तीन लक्ष लोकांनी तेहतीस कोट लोकांवर प्रभुत्व स्थापन केलें आहे. संख्येच्या दृष्टीनें ही स्थिति निमिषार्धांत नाहींशी होण्यासारखी आहे. प्रत्येक मनुष्यानें आपापल्यापरी उद्योग केल्यास स्वातंत्र्याचे दिवस हां हां म्हणतां प्राप्त होतील. स्वार्थत्याग केल्यास स्वतंत्रतादेवीची माळ या देशाच्या गळ्यांत पडेल अशी या लोकांची भावना आहे. पाहिजे त्या मार्गांनीं परकीयांचा नायनाट करणें हेंच आपलें ब्रीद आहे, असें हे लोक समजतात, हे लोक आपण ब्रिटिश राज्यसत्तेचे वैरी आहोंत असें उघडपणें प्रतिपादन करितात.

परकीय राजसत्ता उलथून पाडणें आपलें कर्तव्य आहे असा त्यांचा समज आहे. गुप्त मंडळ्या, राजकीय खून, बांब, ही त्यांची साधनें आहेत. आपल्या उद्दिष्टाच्या साधनाकरितां कोणताही स्वार्थत्याग करण्यास व आपले प्राण खर्चीं घालण्यास हे लोक तयार आहेत. या पक्षांतील लोकांनीं कधींही आत्मनिरीक्षण केलें नाहीं. देशांतील लोक स्वातंत्र्याच्या हक्कास पूर्णपणें लायक आहेत अशी यांची ठाम समजूत आहे. राजकीय आकांक्षा तृप्त होण्यास फक्त परकी सत्तेची अडचण आहे असा यांना भ्रम आहे. आपल्याप्रमाणेंच आपले सर्व देशबांधव एकदिलानें, तत्परतेनें व उत्साहानें पाहिजे तो स्वार्थत्याग करण्यास तयार आहेत, असा यांच्या विचारसरणींतील हेत्वाभास आहे. ब्रिटिश सरकारच्या सत्तेमुळें या वर्गाचा बहुतेक नायनाट झाला आहे. तथापि त्यांचें अस्तित्व या विचारपरंपरेंत लक्षांत ठेवणें अत्यंत जरूर आहे. या वर्गास सत्ताविध्वंसक ( Anarchists ) किंवा अत्याचारी असें नांव देतां येईल. दुसरा वर्ग क्रांतिकारक ( revolutionary ) लोकांचा आहे. पहिल्या वर्गाचे हे उत्पादक व गुरु आहेत. यांच्या अंगीं विद्वत्ता व धूर्तता असल्यामुळें ब्रिटिश राज्याचें शत्रुत्व ते उघडपणें प्रतिपादन करीत नाहीत. आपल्या लेखांनीं व भाषणांनीं तरुण उत्साही परंतु अप्रगल्भ अशा नवीन पिढीवर त्यांनीं छाप बसविली आहे. उपरोधानें, व्यंजनेनें, लक्षणेनें, सादृश्यानें, अनुमानानें ते क्रांतिकारक चळवळीस अप्रत्यक्षपणें साहाय्य करीत असतात. आपल्या भाषणास व लेखास गंभीर व तात्त्विक विचाराचा पेहराव देण्याची त्यांची हातोटी आहे. निर्भेळ स्वराज्य हेंच आपलें अंतिम ध्येय आहे, असें त्यांनी जाहीर केलें आहे. परकीय राजसत्ता हेंच आपल्या दुःखाचें कारण आहे असें हे समजतात. स्वराज्याच्या हक्कास आपण संपूर्णपणें पात्र आहों अशी यांची समजूत आहे. राष्ट्रीय ( nationalist ) हें नांव धारण करण्यास प्रथम सुरुवात यांनींच केली. सनदशीर चळवळीस भिक्षांदेहि असें हे लोक मानतात. सरकाराशी कोणत्याही प्रकारची सहकारिता देशद्रोहाची आहे असें यांचें ह्मणणें आहे. हिंदुस्थानांत प्रचलित असलेलें सरकार व त्याशीं संलग्न असणाऱ्या सर्व संस्था यांजवर संपूर्ण बहिष्कार घालावा असें ते सुचवतात. एका राष्ट्राची दुसऱ्या राष्ट्रावर सत्ता निसर्गतः जुलुमाची असून तिचे ठिकाणीं कोणतेही सात्विक गुण असणें अशक्य आहे, असा त्यांचा सिद्धांत आहे. राज्यक्रांतीशिवाय देशोन्नति होत नाहीं अशी ह्यांची दृढ समजूत आहे. परंतु पहिल्या वर्गाचा स्वार्थत्याग व देशाकरितां

सर्वस्व खर्च करण्याची तयारी या दुसऱ्या वर्गांत नसल्यामुळें, व आत्मरक्षणाची इच्छा या वर्गांत प्रबळ असल्यानें, या वर्गाचे सर्व प्रयत्न गुप्त किंवा दर्शनीय राजनिष्ठ असे आहेत. परंतु यांची ओळख सार्वभौम सरकारास चांगली पटली असल्या कारणानें या वर्गाचाही बहुतेक बीमोड झाला आहे. सरकारच्या रौद्र स्वरूपानें या लोकांनीं देशत्याग केला आहे व परकीय अमलाखालीं राहून त्यांनीं क्रांतिकारक चळवळी चालू ठेवल्या आहेत. सरकारची या लोकांवरील नजर फार तीक्ष्ण असल्यामुळें यांचे बाबतींतही फारसा विचार करण्याचें कारण राहिलें नाहीं.

तिसरा वर्ग जहाल किंवा असंतोषवादी यांचा आहे. यांच्या मतेंही राजकीय अवनतीचें संपूर्ण कारण परकीय राजसत्ता हेंच आहे. स्वराज्य प्राप्त झाल्याखेरीज देशाचें पाऊल कोणत्याही दृष्टीनें पुढें पडणार नाहीं असें यांचेंही निदान आहे. क्रांतिकारक पक्षाचे मार्ग शक्य नाहींत असें या पक्षास वाटतें. सरकारच्या दडपशाहीच्या धोरणानें ही जाणीव या पक्षांत तीव्रतर झाली आहे. परिस्थितीबद्दल या लोकांची भावना किंचित् निराशाजनक आहे. राजकर्त्यांशीं सदैव फटकून वागून शक्य त्या मार्गानें सरकारशीं विरोध करावा व निरुपाय असेल त्या ठिकाणींच सरकारशीं सहकारितेनें वागावें असें यांचें म्हणणें आहे:—

( Opposition wherever possible, association wherever indispensible ) अर्ज, विनंत्या व डेप्युटेशनें हे मार्ग यांस भिक्षांदेहीचे वाटतात. दुष्काळ, प्लेग किंवा इतर आकस्मिक व संकटाचे प्रसंगी सरकारास मदत करणें त्यांस स्वाभिमानशून्यतेचें दिसतें. म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलें हीं सर्व निर्जीव व स्वराज्याच्या दृष्टीनें तादृश उपयोगाचीं नाहींत असा यांचा अभिप्राय आहे, तरी पण त्यांच्या अस्तित्वाचा फायदा घेऊन त्याच्या द्वारें सरकारास शक्य तितका विरोध करावा असें यांचें मत आहे. शांततेपासून यत्किंचितही उपयोग न होतां देशांतील लोकांचा तेजोभंग होऊन ते दिवसेंदिवस मेषपात्र होत चालले आहेत, असें हे लोक मानतात. सुराज्यापासून स्वराजाची प्राप्ति न होतां आपलें उद्दिष्ट मागें राहून लोकांची फसवणूक होत आहे असा यांचा समज आहे. राजकीय उन्नतीखेरीज औद्योगिक, सामाजिक व नैतिक उन्नति होणें अशक्य आहे, असा यांचा सिद्धांत आहे. स्वावलंबनाचे मार्गास हलींच्या काळांत अवसर नाहीं; व यदाकदाचित् या मार्गाचें अवलंबन केलें तर सरकार तें हाणून पाडील असें

यांचें प्रमेय आहे. " असंतोषः श्रियो मूलम् " हें यांचें सूत्र आहे. शक्य त्या उपायांनीं देशांत असंतोष पसरावा व अडवणुकीच्या मार्गानें राज्यकर्त्यांस ' सळो कीं पळो करून सोडावें ' असा यांचा उद्देश आहे. सर्वत्र बखेडा व अनवस्था जाहल्यानंतर स्वराज्यप्राप्ति होईल, असा यांचा विश्वास आहे. अस्वस्थतेपासून किंवा घोंटाळ्यापासून स्वराज्य कसें प्राप्त होईल याचा ते विचार करूं इच्छित नाहींत. किंबहुना या वाटाघाटींची आजमित्तीस जरूरच नाहीं असें ते प्रतिपादन करतात. भावी स्वराज्य लोकसत्तात्मक होईल किंवा एकतंत्री होईल याची मीमांसा करणें त्यांस अप्रयोजक वाटतें. सारांश, असलेल्या परिस्थितीबद्दल सदैव खिन्नता बाळगून हरप्रयत्नानें असंतोष उत्पन्न करावा व यांतच देशाचा तरणोपाय आहे, असें या पक्षाचें धोरण आहे. या धोरणाप्रमाणेंच त्यांचें वर्तन आहे.

चवथा पक्ष नेमस्त लोकांचा किंवा प्रागतिकांचा आहे. तीन लक्ष-लोकांनीं तेहतीस कोट लोकांवर राज्य स्थापन केलें याचें कारण या अल्पसंख्याक लोकांचें सामर्थ्य नसून आपल्या लोकांतील दुही व अज्ञान हेंच आहे, असें यांचे ठाम मत आहे. परकीय राजसत्तेच्या येथील प्रत्येक प्रतिनिधीचें सामर्थ्य तीन लक्षांचें आहे, व आपल्या कोणत्याही कृत्यास सार्वभौम सत्तेचा पाठिंबा आहे असा त्यांचा आत्मविश्वास असतो. परंतु प्रजाजनांपैकीं प्रत्येक व्यक्ति आपापल्यापरी एकटीच असून समवायानें कोणतीही संघशक्ति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य तिच्यांत प्राप्त झालेलें नाहीं; व याच कारणामुळें जित व जेते यांचे मधील संख्येचें विषम प्रमाण मुळींच आश्चर्योत्पादक नाहीं. या अनुमानावरून परकीय राजसत्ता नाहींशी होऊन कार्यभाग होईल असें या पक्षास मुळीच वाटत नाहीं. एक सत्ता जाऊन दुसरी कोणती तरी स्थापन होईल व या देशाचे नशिबीं असलेलें दास्य केव्हांही सुटणार नाहीं. यासाठीं हल्लींची हीन स्थिति घालविण्यास देशांतील अज्ञानाचा निरास करून संघशक्ति उत्पन्न केली पाहिजे, असें या पक्षाचें म्हणणें आहे. हें करण्यास देशांत शांतता असली पाहिजे व सुराज्यव्यवस्था ( Good Goverennent ) असली पाहिजे. ब्रिटिशसरकारानें या देशांत शांतता स्थापन केली आहे व सुराज्याचा लाभही येथील लोकांस दिला आहे. या स्थितीचा फायदा घेऊन देशांत संघशक्ति वाढविणें organized life शक्य व अत्यंत सुलभ झालें आहे. असंतोष व अस्वास्थ्य उत्पन्न करण्यानें देशोन्नतीच्या या मार्गांत विघ्न

येईल अशी या वर्गाची समजूत आहे. विश्वविद्यालयें व शिक्षणाचा प्रसार यांच्या योगानें देशांतील पुढारी वर्गातील व्यक्तिविषयक उन्नति होण्यास पुष्कळ अवसर मिळाला आहे. शिक्षणानें व सवलतीनें राज्यकर्त्यांच्या बरोबरीनें योग्यता प्राप्त होण्यास हल्लींच्या राज्यव्यवस्थेंत सुलभ झालें आहे. मुख्यत्वेंकरून उन्नतीच्या मार्गातील अडचण म्हणजे सामान्य जनतेची (averages) आहे. यांच्यामध्यें निबिड अज्ञान वसत असून कोणतीही कार्यक्षमता दिसून येत नाहीं. यांच्या उन्नतीसाठीं आतांपर्यंत यत्किंचित्‌ही प्रयत्न झालेला नाहीं. हल्लींच्या राज्यांतील शांततेचा व सवलतीचा फायदा घेऊन, सर्वत्र ज्ञानप्रसार करून, सहकारी तत्त्वाचा (co-operation) विस्तार करून देशांत संघशक्ति ( organised life ) उत्पन्न करावी, अशी या वर्गाची समजूत आहे. या संघशक्तीच्या योगानें देशांतील लोकांस स्वराज्याची जबाबदारी अंगावर घेण्याचें सामर्थ्य येईल. यासाठीं प्रचलित राज्यव्यस्थेस विरोध करणें आत्मघाताचें आहे, अशी या वर्गाची कल्पना आहे. ग्रामसंस्था, म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलें या सर्व स्वराज्याच्या शाळा आहेत. या सर्व संस्थांचा उपयोग करून व अनुभव संपादून सरकारशीं सहकारित्वानें वागल्यास या संस्थांचा विकास स्वराज्यांत होईल अशी या वर्गाची आशा आहे. सुराज्यापासून स्वराज्यप्राप्ति हा उत्क्रांतीचा नियम आहे, असा या वर्गाचा सिद्धांत आहे. हल्लींचें सरकार परकीय असलें तरी तें सर्वस्वी तमोगुणांनी प्रेरित आहे असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. शिक्षणाचा प्रसार, दवाखाने, साथीच्या रोगाचें निवारण, दुष्काळासारख्या आपत्तीची सदय व्यवस्था, आरोग्यरक्षण व शासनसंस्था या सर्वांवरून राज्यव्यवस्थेंतील सात्त्विक प्रवृत्तीचा अनुभव प्रत्ययास येतो. राज्यकर्तेंही सुशिक्षित संस्कृतीमध्यें वाढले असल्यामुळें न्याय व सदसद्विवेकबुद्धिग्राह्य अशा सवलती त्यांजकडून मिळतील असें मानण्यास कोणतीच हरकत नाहीं. याच समजुतीनें, सरकारशीं शक्य त्या ठिकाणीं सहकारिता व अवश्य त्या ठिकाणीं विरोध, असें या वर्गाचें ब्रीद आहे. " Opposition wherever necessary, association wherever possible. अर्ज, विनंत्या व डेप्युटेशनें हेच योग्य मार्ग आहेत, यांचें अवलंबन करण्यांत या पक्षास कोणताही मानभंग वाटत नाहीं. प्लेग, दुष्काळ इत्यादि आपत्तींच्या वेळीं सरकारास मदत करून दुःख निवारण्याचें क्षेत्र शक्य तितकें

विस्तृत करण्यांत आत्महितच आहे अशी या वर्गाची भावना आहे. स्वावलंबनाचा उपाय योजून शक्य त्या मार्गांनीं संघटित समाजव्यवस्था स्थापित करण्यास हल्लींच्या राज्यव्यस्थेंत पुष्कळ अवकाश आहे व याप्रमाणें प्रयत्न करून स्वराज्याची तयारी करणें हें आद्य कर्तव्य आहे असें या लोकांस वाटतें. असंतोष उत्पन्न करण्यांत कांहीं पुरुषार्थ नसून सरकारशीं विरोधाचें तत्त्व अनवश्यक प्रसंगीं तात्विक दृष्ट्या चालू ठेवणें हें असमंजसपणाचें आहे, असा या वर्गाचा अनुभव आहे. सरकारशीं सहकारिता ठेवून, असलेल्या सवलतींचा फायदा घेऊन, आत्मोन्नति करावी असा त्यांचा मानस आहे. अस्वस्थतेपासून किंवा घोंटाळ्यापासून स्वराज्यप्राप्ति होणें अगदीं अशक्य आहे, अशी या वर्गाची खात्री आहे हिंदुस्थानचें ध्येय प्रजासत्तात्मक राज्य हें असून हल्लींच्या शासनसंस्थांचा विकास होण्यानें तें प्राप्त होईल असा यांचा दृढ विश्वास आहे. ग्रामपंचायतीपासून तों वरिष्ठ कायदेकौन्सिलपर्यंत सर्व संस्था त्यांस आदरणीय वाटतात. असंतोष उत्पन्न करण्यापासून आसुरी प्रवृत्ति उत्पन्न होईल, यासाठीं सनदशीर मार्गानें, सहकारितेनें, सलोख्यानें सात्विक गुणांचा विकास करून आत्मोन्नति प्राप्त करून घ्यावी हा या वर्गाचा संकल्प आहे. स्वावलंबनानें, आत्मतंत्रपणानें हें साध्य करून घ्यावयाचें असा या वर्गाचा कार्यक्रम आहे.

## तत्वाचा फरक.

याप्रमाणें राजकीय बाबतींत पुढाकार घेणाऱ्या दोन वर्गांमध्यें निदानाबद्दल, व उपायाबद्दल महदंतर आहे, या वर्गाची एकवाक्यता होणें अगदीं अशक्य आहे. जहाल पक्षास सर्व अवनतीचें मूळ परकीय राजसत्ता असें वाटतें; नेमस्त पक्षास परकीय राजसत्ता ज्या योगानें येथें प्रस्थापित झाली ती आपसांतील दुही आपल्या दुःखाचें कारण आहे असें वाटतें. जहाल पक्षास आपल्या ठिकाणीं कोणतीही उणीव नसून स्वराज्याच्या हक्कास आपण लायक आहों असें वाटत आहे; नेमस्त पक्षास देशांतील अज्ञान व विस्खलित समाजव्यवस्था या योगानें स्वराज्याचा लाभ होण्यापूर्वीं पुष्कळ पूर्वतयारी केली पाहिजे असें वाटत आहे. जहाल पक्षास हल्लींच्या राज्यव्यवस्थेनें आपला तेजोभंग होत असून आपल्यांतील कर्तबगारी व माणुसकी नाहींशी होत आहे असें वाटत आहे; नेमस्त पक्षास हल्लींच्या राज्यव्यवस्थेंतही कर्तबगारीस कांहीं जागा

असून हल्लींच्या शासनसंस्था म्हणजे ग्रामसंस्था, म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, स्थानिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलें या स्वराज्यमंदिराच्या पायऱ्या आहेत असें वाटत आहे. जहाल पक्षास सुराज्य ( good government ) व शांतता हीं देशोन्नतीस विघातक वाटतात; नेमस्त पक्षास या दोन्हींच्या योगानें शिक्षणाचा व संघशक्तीचा विस्तार करून देशांत राजकीय चैतन्य ( political consciousness ) उत्पन्न करतां येईल असें वाटतें, व यामुळेंच शांतता व सुराज्य हीं त्यांस अत्यंत आवश्यक वाटत आहे; नेमस्त पक्षास असंतोष उत्पन्न करणें राजकीय स्वास्थ्यास आवश्यक वाटत आहे; नेमस्त पक्षास असंतोषापासून अस्वस्थता व अस्वस्थतेपासून राजकीय अवनति अशी संकटपरंपरा मूर्तपणें दिसत आहे. जहाल पक्षाला इंग्लंडांतील सामान्य जनतेंत न्याय व स्वातंत्र्यप्रियता आहे असें वाटत नाहीं. यासाठीं इंग्लंडांत राजकीय चळवळ करणें त्यास अप्रयोजक वाटतें. इंग्लंडांतील सामान्य जनतेची न्याय व स्वातंत्र्याची कल्पना उदारपणाची आहे, अशी नेमस्त पक्षाची समजूत आहे. त्यासाठीच त्यांनीं इंग्लंडांत राजकीय चळवळ चालू ठेविली आहे. तिच्यासाठीं ते पदरचे पैसे खर्च करीत आहेत; व ती त्यांस अत्यंत अवश्य वाटत आहे. जहाल पक्षाचा अर्ज डेप्युटेशननें व मुलाखती यांवर मुळींच विश्वास नाहीं; नेमस्त पक्षास अन्यायाचा प्रतीकार करण्यास हेच प्रशस्त मार्ग वाटत आहेत. अंत्यजांचा उद्धार, अशरणांचें संरक्षण व सहकारी चळवळ, यांवर जहाल पक्षाची भिस्त नाहीं, नेमस्तपक्षाचा यांवर संपूर्ण विश्वास असून देशामध्यें शिक्षणाचा प्रसार करून सहकारी तत्वानें संघशक्ति उत्पन्न केल्यास आत्मोन्नति खचित होईल असें त्यांस वाटत आहे. जहाल पक्षास हल्लींच्या शासनसंस्था लहान मुलांच्या खेळण्याप्रमाणें फसवेगिरीच्या वाटतात; नेमस्त पक्षास भावी उन्नतीचा पाया यांवरच अवलंबून आहे, असें वाटत आहे. जहाल पक्षास असंतोषापासून घोटाळा ( chaos ) उत्पन्न होईल व त्यांतून स्वराज्य प्राप्त होईल, असें वाटतें, नेमस्त पक्षास असंतोषापासून बेबंदशाही होईल, व एका परकीय सत्तेच्या ऐवजीं दुसरी स्थापन होऊन प्रजासत्तात्मक राज्याची आशा समूळ नष्ट होईल असें वाटत आहे. जहाल पक्षास हल्लींच्या अमदानींत कोणताही उत्साहजनक कार्यक्रम दिसून येत नाहीं, व सरकारच्या कृत्यांचा वेळीं अवेळीं निषेध करून अडवणुकीच्या मार्गानें असंतोष उत्पन्न करावा, एवढीच त्यांची कर्तव्यमर्यादा (gospel of discontent and despair)

आहे. नेमस्त पक्षास आत्मोन्नतीचे, स्वावलंबनाचे पुष्कळ उपाय दिसत असून मनुष्यबळाची वाण पदोपदीं भासत आहे. जहाल पक्ष रोगाचें जें कारण मानीत आहे, त्या कारणाचें आदिकारण नेमस्तपक्षास दिसत आहे. या एका महत्त्वाच्या फरकामुळेंच उपायाच्या प्रत्येक बाबतींत दोहों पक्षांत महत्त्वाचा मतभेद दिसत आहे. परकीय सत्ता हेंच कारण मानल्यास जहाल पक्षाची मीमांसा बरोबर होईल; देशांतील हीन स्थिति, विस्खलित समाजव्यवस्था व निबिड अज्ञान हेंच आदिकारण मानल्यास नेमस्त पक्षाची चितनिका सर्वस्वीं ग्राह्य वाटेल. शास्ते व शासित यांतील संख्येच्या विषमतेचा उलगडा नेमस्तांच्या अनुमानावरूनच स्पष्ट होत आहे. पक्षभेदाची मीमांसा गोपाळरावजींनी फार बारकाईनें केली आहे. सकलित रीतीनें तिचें वर्णन करण्याचा वर प्रयत्न केला आहे. प्रागतिक पक्षाच्या तत्वांचा यावरून चांगला बोध होईल.

## सरकारशीं सहकारित्व.

१९०५ सालीं कर्झनशाही संपल्यानंतर बेमुरवत राज्यकारभाराचे परिणाम स्पष्ट दिसूं लागले. फाळणीची खटपट सर्वस्वीं व्यर्थ झाल्यामुळें सनदशीर चळवळीवरील लोकांचा विश्वास उडाला. फुलरसाहेबांसारखे स्वैर वर्तनाचे अधिकारी निरंकुशपणें अंमल चालवूं लागले. त्रस्त व उद्विग्न झालेलें लोकमत प्रतीकार करण्याकरितां तत्पर होतें. याच संधीस क्रांतिकारक चळवळीचा प्रारंभ झाला. वर्तमानपत्रांच्या द्वारें सनदशीर चळवळीचा फोलपणा भासविण्याची मोहीम सुरू झाली. क्रांतिकारक तत्वांचा अनुवाद सर्वत्र होऊं लागला. परवशतेची कहाणी केव्हांही कर्णमधुर व चित्तवृत्ति प्रक्षुब्ध करणारी असते. अशा स्थितींतही इतर मार्गांची निष्फलता नजरेपुढें येऊं लागली, म्हणजे उत्साही मनाचा कल क्रांतिकारक पक्षाकडे तत्काल वळतो. देशभक्तीनें प्रेरित झालेले पुष्कळ तरुण होतकरू लोक या नवीन चळवळीच्या जाळ्यांत सांपडले. गुप्त मंडळ्यांची सुरुवात झाली. बॉबचा प्रादुर्भाव झाला. राजकीय खुनासारखे अत्याचार होऊं लागले. व शेंकडों तरुणांची या ज्वालामुखींत आहुति पडूं लागली. विद्यार्थिवर्गाची मानसिक समता डळमळूं लागली. शिक्षकांस व पालकांस मोठी विवंचना पडली. देशांतील पुढारी म्हणविणारे लोक सुद्धां किंकर्तव्यतामूढ होऊन त्यांनीं तटस्थवृत्ति स्वीकारली. असंतोषाची लाट दडपून टाकण्याकरितां सर-

कारानें उग्र स्वरूप धारण केलें. सर्वत्र चिंता व भय उत्पन्न झालें. अशा वेळीं सरकारासही आपल्या सामर्थ्याचा दुरुपयोग न करतां लोकांचें सांत्वन करण्याकडे अमर्याद राजसत्तेचा उपयोग करावा, असें निस्पृहपणें सांगण्याची जरूर होती. लोकांसही क्रांतिकारक चळवळ परिणामीं आत्मघातक असून या बलाढ्य साम्राज्याच्या शक्तीपुढें तिची सर्वथैव धूळदाण होईल, यासाठीं तिजपासून परावृत्त होणें व राजनिष्ठ राहणें अत्यंत जरूरीचें असून यांतच देशहित व आत्महित आहे; असें अधिकारानें सांगणारा पुढारीही यावेळीं पाहिजे होता. हीं दोन्हीं कामें गोपाळरावजींनीं फार उत्कृष्ट रीतीनें बजावलीं. १९०७ सालीं लॉर्ड मिंटो साहेबांस त्यांनीं लोकांचें सांत्वन करण्याचा फार कळकळीचा व फार मुत्सद्देगिरीचा उपदेश केला. याच वर्षीं क्रांतिकारक तत्त्वांच्या प्रसारास विरोध करण्याकरितां त्यांनीं संयुक्त प्रांतांत प्रवास केला; व देशांतील राजकीय स्थितीचें साग्र विवेचन करून प्रागतिक पक्षाचीं तत्त्वें या देशाच्या उन्नतीस सर्वस्वीं कारणीभूत होतील व यांतच देशाचा तरणोपाय आहे, असें त्यांनीं प्रचंड जाहीरसभांतून उघडपणें बोलून दाखविलें. १९०८ सालीं सुधारणेच्या योजनेच्या वेळीं त्यांचें स्वरूप उपयुक्त व्हावें व त्यापासून देशाचें पाऊल पुढें पडावें, या दृष्टीनें त्यांनीं खटपट केली. सनदशीर चळवळीवरील लोकांचा उडालेला विश्वास, खरे व कल्याणकारक राजकीय हक्क देऊन पुनः स्थापित केला पाहिजे, असें त्यांनीं सरकारास सुचविलें. याप्रमाणें एका पक्षाकडून जें करणें शक्य होतें तें त्यांनीं असामान्य खटपटीनें घडवून आणिलें. तसेंच १९०९ सालीं असंतोषाच्या अगदीं आणीबाणीच्या वेळीं राजनिष्ठपणानें सरकारास साहाय्य करून देशांत शांतता राखण्याची किती आवश्यकता आहे हेंही त्यांनीं आपल्या भाषणांनीं व लेखांनीं जाहीर केलें. मुंबई व पुणें येथें या वेळीं त्यांनीं दिलेलीं व्याख्यानें त्यांच्या लोकोत्तर धैर्याची साक्ष देत आहेत. क्रांतिकारक चळवळ अगदीं विकोपास पोंचली असतां तिची यत्किंचितही परवा न करतां, सवंग लोकप्रीतीच्या आशेस न पडतां, लोकनिंदेचें भय न बाळगतां, प्रसिद्धपणानें गोपाळरावजींनीं अप्रिय परंतु अत्यंत पथ्यकर उपदेश आपल्या देशबांधवांस केला. हिंदुस्थानच्या राजकर्त्यांनीं वेळोवेळीं " हिंदुस्थानचे लोकांस सुशिक्षित करून त्यांचे ठिकाणीं स्वराज्याच्या हक्कांची पात्रता आणून, साम्राज्यांत त्यांचा दर्जा इभ्रतीचा, लौकिकाचा व स्वतंत्रतेचा करावयाचा आहे.— "

अशीं आश्वासनें दिलीं आहेत. राज्यकर्ते व प्रजाजन यांमधील कराराची ही एक बाजू आहे. कराराची दुसरी बाजूही प्रजेच्या वर्तीची असून त्यांनींही प्रस्थापित झालेल्या राज्यपद्धतीस राजनिष्ठ राहण्याचें अभिवचन दिलें आहे व त्याप्रमाणें प्रजेनें वागण्याचीही आवश्यकता आहे, असें गोपाळरावजींनीं आग्रहानें लोकांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न केला. पुष्कळ अविचारी लोकांकडून गोपाळरावजींस याबद्दल दोष देण्यांत आला. माथेफिरूंनीं त्यांस देशद्रोही ठरविलें. क्रांतिकारक चळवळींत त्यांच्या जिवाचीही आहुति घेण्याचे प्रयत्न झाले होते. परंतु खऱ्या देशभक्तीनें प्रेरित होऊन अलौकिक मानसिक धैर्यानें गोपाळरावजीनीं आपलें कर्तव्य करण्यास कसूर केली नाहीं. या बाबतींत एका पत्रकारानें त्यांचेबद्दल काढलेले उद्गार फार मार्मिकपणाचे आहेत. " गोपाळरावजीमध्यें तात्विक शांतपणा व सात्विक उत्साह या दोहोंचें संमिश्रण झालें आहे. खरी राजनिष्ठा व निस्सीम देशाभिमान या दोहोंचाही संयोग गोपाळरावजींचे ठिकाणीं अपूर्वपणें दिसून येतो. "‡

गोपाळरावजींनीं या वेळीं दाखविलेली मुत्सद्देगिरी फार उच्च दर्जाची असून तिची थोरवी या बिकट प्रसंगीं संपूर्णपणें निदर्शनास आली. या कामगिरीचें वर्णन नामदार आगाखान यांनीं फार बहारीचें केलें आहे:—

" Ten years ago there were phenomena with infinitely more dangerous possibilities than we can now realise. It seemed to even those who by tradition, sentiment and interest were most attached to the British Raj that sooner or later they would have to choose between their loyalty to their Government or their duty to their country and race ; and their was the distinct danger that a

‡ "Mr. Gokhale is perhaps the one leader in the country who satisfies Herbert Spencer's ideal of a public man in whom there is due commingling of philanthropic energy and philosophic calm. He typifies in his person the equal love of order and progress and shows how the truest loyalty and the most uncompromising patriotism can be combined."

" *Leader.* "

day might come when the two duties might become irreconcilable. If that was a nightmare to those who had a stake in the country, there were others with less responsibility who had hastily come to the conclusion that there was no possibility of development under the flag and that terrible as were the consequences yet chaos and destruction had to come before a new evolution could make a self-respecting position possible for their country. To these parties and schools of thought which practically monopolised the thinking and the patriotic in 1905–6, Gokhale showed that this very Government and this very empire had all the elements which were full of possibilities and was capable of assuring for their country a great and self-respecting future in the fulness of time; and that disruption and destruction were not only wicked but unnecessary, and that within the British empire and under the sovereign's crown and thorns the noblest of India's aspirations could be in times satisfied. It was fortunate for the country and the empire that in those days of unrest, we did find a political leader of the capacity and character of Gokhale who by his wise attitude, was able to take the wind out of the sails of the revolutionaries and at the same time both strengthen the Government and the sensible portion of the people."

येथ पर्यंत गोपाळरावजींच्या मुत्सद्देगिरीचें आम्हीं शक्य तितक्या संक्षेपानें वर्णन केलें आहे. गोपाळरावजींच्या मुत्सद्देगिरीचा कळस पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या कामगिरीनें व लढाईनंतर मिळावयाच्या हक्कांच्या चळवळीमध्यें झाला असता. परंतु परमेश्वरी सूत्र कांहीं निराळें होतें. कमिशनच्या बाबतींत गोपाळरावजींनीं किती खटपट केली, हिंदुस्थानची बाजू समर्थन करण्याकरितां किती श्रम घेतले, आपल्या विद्वत्तेनें कमिशनमध्यें कसें वर्चस्व स्थापित केलें, आपल्या मुत्सद्देगिरीनें कमिशनमध्यें कांहीं बाबतींत एकवाक्यता उत्पन्न करण्याचा कसा प्रयत्न केला, व तडजोडीच्या योगानें दुष्प्राप्य असे हक्क सुद्धां मिळविण्याची किती अनुकूल परिस्थिति घडवून आणिली होती, या सर्वांचें

वर्णन करणें गोपाळरावांच्या निधनानें अशक्य झालें आहे. कमिशनची कामगिरी पुरी व्हावयाची आहे. कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध व्हावयाचा आहे. कमिशनच्या सभासदांना आपला अनुभव सांगण्याची मुभा नाहीं. अशा स्थितींत या बाबतींत मुग्धपणाच स्वीकारणें भाग पडलें आहे. कमिशनमधील एतद्देशीय सभासदांचा गोपाळरावजींवर पूर्ण विश्वास होता. त्यांच्या नेतृत्वाखालीं कमिशनचें काम पुरें करण्यास ते तयारही होते. गोपाळरावजींचे हे थोर स्नेही गोपाळरावजींचे हेतू लक्षांत ठेवून कमिशनच्या कामांत गोपाळरावजींच्या आकांक्षास मूर्त स्वरूप देतील अशी आम्हांस आशा आहे.

## देशोन्नतीची कल्पना

गोपाळरावांची देशभक्ति अत्यत निस्सीम होती. वीस वर्षेपर्यंत डे. ए. सोसायटींत काम केल्यानंतर त्यांनीं विश्रांति घेतली असती, तर त्यांत कोणतेंही वावगें झालें नसतें. परंतु विश्रांतीची कल्पना बाजूस ठेवून त्यांनीं अधिक जबाबदारीच्या, अधिक त्रासाच्या व अधिक उपयुक्ततेच्या देशकार्यांत एक तपपर्यंत आयुष्य घालविलें. धार्मिक दृष्टीनें सुद्धां कोणत्याही भक्तीला आश्रयस्थान असावें लागतें. आराध्य देवतेची कल्पना—मग ती सगुण असो किंवा निर्गुण असो—मूर्तपणें दृष्टीसमोर असल्याखेरीज भक्तीच्या ठिकाणीं दृढता येत नाहीं, देशाच्या उन्नतीचें स्वरूप गोपाळरावांच्या पुढें मूर्तिमंत असल्यामुळें त्यावरील त्यांची भक्ति, कितीही संकटपरंपरा आली तरी यत्किंचितूही ढळली नाहीं. कित्येकांस देशाच्या भावी उन्नतीची कल्पनाच नाहीं. त्यांची दृष्टि अगदीं अंध आहे. देशाच्या अज्ञेय, अमूर्त व अनिश्चित अशा भावी कल्पनेमुळें त्यांच्या देशभक्तीला सुद्धां स्थिरता प्राप्त झालेली नाहीं, व त्यांचे देशाच्या उन्नतीचे प्रयत्न आत्मविश्वासाचे होत नाहींत. अज्ञानामुळें त्यांच्या अंतःकरणप्रवृत्तींत चलबिचल होत असते. हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजसत्ता ऊर्ध्वमूल अश्वत्थ वृक्षाप्रमाणें आहे. ती वरपासून खालीं पसरत चालली आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेट, व्हाइसरॉय व प्रांतिक गव्हर्नर, यांच्या सत्तेस लोकमताचें नियंत्रण पाहिजे, असें सरकारास वाटून त्याप्रमाणें अंशतः तजवीज झाली आहे. स्टेट सेक्रेटरी, व्हॉइसराय, प्रांतिक गव्हर्नर, यांचे कार्यकारी कौन्सिलांत हिंदी लोकांचा प्रवेश व कौन्सिलांतील प्रजेचे वाढलेले हक्क यांवरून वरील गोष्टीची सत्यता दिसून येत आहे. परंतु जिल्ह्याचे अधिकारी कलेक्टर यांच्या

वर मात्र लोकमताचा ताबा असण्याची आज मित्तीस जरूर भासत नाहीं. लोक समजून घेण्याकरितां जिल्हा दरबारांचा प्रयोग मुंबई इलाख्यांत चालू आहे. इतर इलाख्यांतून याचा मागमूसहि नाहीं. डिस्ट्रिक्ट कौन्सिलें स्थापून प्रांतिक कौन्सिलाप्रमाणें जिल्ह्याचे कलेक्टर यांच्या निरंकुश सत्तेस आळा घालावा असें गोपाळरावांनीं सुचविलें होतें. डिस्ट्रिक्ट बोर्डें व म्युनिसिपालिटया या संपूर्णपणें लोकनियुक्त करून त्यांची सांपत्तिक स्थिति सुधारावी असें गोपाळरावांचें मागणें होतें. लॉर्ड मोर्ले यांच्या वेळीं बसलेल्या अधिकारविभागणी—कमिशनचाही हाच हेतु होता. त्याचप्रमाणें राजकीय घटनेचे आधारस्तंभ व आद्यघटक म्हणजे ग्रामसंस्था (village panchayats) अस्तित्वांत आणण्याचाही त्यावेळीं संकल्प होता. परंतु कमिशनमधील लोकांच्यापासून लॉर्ड मोर्ले साहेबांस जी मदत व्हावयास पाहिजे होती, ती झाली नाहीं यामुळें त्यावेळीं पुष्कळ निराशा झाली. परंतु भावी स्थितीची वाढ कोणत्या दिशेनें व्हावयास पाहिजे, याचें रेषाचित्र मात्र काढलें गेलें. दीर्घ प्रयत्नांनीं, सनदशीर चळवळींनीं काय संपादन करतां येईल हें मात्र दृग्गोचर झालें आहे. प्राथमिक शिक्षण सर्वत्र सक्तीचें व मोफत झालें. सहकारी तत्वानें लोकांत कार्यक्षमता आली, ग्रामसंस्था ठिकठिकाणीं स्थापन झाल्या, म्हणजे सामान्य जनतेचा प्रश्न ( Problem of averages ) सुटल्यासारखा होईल. राज्यव्यवस्थेचा हाच पाया आहे. स्वराज्याची खंबीर इमारत या पायावर चिरस्थायी होण्यास कोणतीही अडचण पडणार नाहीं. प्रजासत्ताक राज्यांतील सर्व ठिकाणचा अनुभवही असाच आहे. प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार हें सरकारचें आद्य कर्तव्य आहे, असें सर्व स्वतंत्र व सुधारलेल्या देशांत मानलें जातें. ब्रिटिश मुत्सद्यांनीं ही गोष्ट कबूल केली आहे. प्रत्येक दहा मुलांपैकीं नऊ मुलांस निरक्षरपणें आयुष्य कंठणें भाग पडावें, दर पांच खेड्यांत चार खेड्यांस शिक्षणाची मुळींच सोय असूं नये, या स्थितीचें गोपाळरावजींचें सूत्रमय वर्णन ऐकून प्रत्येक इंग्लिश मनुष्यास शरम वाटत असे. या बाबतींत गोपाळरावजींसारखा मुत्सद्देगिरीनें प्रयत्न झाल्यास हा प्रश्न लौकरच सुटेल असें मानण्यास जागा आहे. सहकारी तत्त्वाची चळवळ ही सर्वस्वीं लोकांवर अवलंबून आहे. राजकारणांत स्वावलंबनाला जर कोठें अवकाश असेल, तर तो याच ठिकाणीं संपूर्णपणें आहे. प्राथमिक शिक्षण व सहकारिता या जोडगोळीनें देशाच्या स्थितींत महत्त्वाची

सुधारणा घडून येण्याचा संभव आहे. याप्रमाणें पायाची रचना झाल्यावर लोकनियुक्त डिस्ट्रिक्ट कौन्सिलें ( District Conucils ) स्थापन करून जिल्ह्यांतील अधिकाऱ्यांवर त्यांचें नियंत्रण स्थापन केलें पाहिजे. प्रांतिक कायदेकौन्सिलाची वाढ होऊन त्यांत प्रत्येक जिल्ह्यांतील डिस्ट्रिक्ट बोर्ड व म्युनिसिपालिटी ह्यांच्या प्रतिनिधींचा प्रवेश झाला पाहिजे. अल्पसंख्याक वर्ग, व्यापारी मंडळें, विश्वविद्यालयें व जमीनदार इत्यादि लोकांच्या प्रतिनिधींचाही त्यांत समावेश झाला पाहिजे. प्रांतिक कायदे कौन्सिलांत लोकानियुक्त सभासदांचें निःसंदेह मताधिक्य असलें पाहिजे. तसेंच कार्यकारी ( executive ) कौन्सिलाच्या सभासदांची निरनिराळ्या खातेवारीप्रमाणें संख्या वाढवून त्यांपैकीं निम्या तरी जागा हिंदी लोकांस हक्कानें मिळाल्या पाहिजेत, व हिंदी कौन्सिलरांची नेमणूक प्रांतिक कायदे कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांनींच केली पाहिजे. प्रांताच्या उत्पन्नावर प्रांतिक सरकारचें संपूर्ण स्वामित्व असलें पाहिजे. प्रांतिक करारांत ( Provincial Contract ) या दृष्टीनें फरक झाला पाहिजे. हिंदुस्थान सरकारकडून प्रांतिक सरकारास मदत मिळण्याऐवजीं प्रांतिक सरकाराकडून मदत ( Grant ) मिळाली पाहिजे. प्रांतिक बजेटावर लोकांचा ताबा राहून लोकनियुक्त सभासदांनीं कौंसिलपुढें आणलेल्या व मंजूर झालेल्या ठरावास कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें पाहिजे, प्रांतिक स्वराज्य (Provincial Autonomy ) म्हणून जें म्हणतात तें वरील प्रकारचेंच होय. दिल्लीदरबारच्या खलित्यांतही प्रांतिक स्वराज्याचें ध्येय सरकारनें मान्य केलें आहे. हें घडवून आणण्यास राज्यक्रांतीची जरूर नाहीं, राजकीय उलथापालथीची आवश्यकता नाहीं व अनवस्था उत्पन्न करण्याचेंही प्रयोजन नाहीं; स्वावलंबनानें, स्वतःच्या लायकीनें, सहकारितेनें, स्वार्थत्यागानें, व दीर्घ परिश्रमानें हें प्राप्त होण्याजोगें आहे. प्लेटोच्या प्रजासत्ताक राज्याप्रमाणें हें काल्पनिक नाहीं. हें बुद्धिगम्य आहे, शक्य कोटींतील आहे व सुलभप्राप्य आहे. तसेंच जबाबदारीच्या जागा योग्य प्रमाणानें कमिशनसारख्या चळवळीनें येथील लोकांस मिळाल्यास व प्रस्तुतच्या अश्रुतपूर्व लढाईसारख्या संकटापासून बोध घेऊन राजकर्त्यांनीं येथील लोकांस लष्करी शिक्षणाचा लाभ दिल्यास, वसाहतीसारखें स्वराज्य येथें स्थापन होण्यास फार कालातिपात लागेल असें वाटत नाहीं. हल्लींच्या सर्वसंहारक अशा युद्धामुळें, राजकर्त्यांचें यांत पुष्कळ आत्महित आहे, अशी जाणीव उत्पन्न झालेली दिसते. शांततेनंतर उदारमतवादी

मुत्सद्यांनीं शहाणपणाचा बोध घेतल्यास गोपाळरावजींनीं सुचविलेलें वसाहतीं-तील स्वराज्याचें ध्येय दृष्टिपथांत येईल. राजकीय वातावरणांत या दिशेनें वारा वाहूं लागला आहे. देशोन्नतीची अशी मूर्त व स्पष्ट कल्पना गोपाळ-रावजींच्या पुढें असल्यानें त्यांची देशभक्ति अनन्यशरण होती. आपल्या भक्तांची कसोटी लावण्याचा परमेश्वराचा सुद्धां उपक्रम आहे, व तोच अनु-भव या आधिभौतिक अराध्यदेवतेच्या बाबतींतही गोपाळरावांस आला होता. अपमान, उपहास, हेतुविपर्यास या सर्व प्रकारचा छळ गोपाळरावजींनीं एक-सारखा सोसला. त्यांच्या उन्नतीस प्रारंभ झाल्यापासून त्यांचा सदैव द्वेष कर-णारा एक वर्ग अस्तित्वांत होता. माफी प्रकरणांतही गोपाळरावांचा तिरस्कार याच वर्गानें केला होता. गोपाळराव लोकांस ( brute force ) म्हणतात असा कांगावा यांनीच केला. दीर्घोद्योगानें गोपाळरावांनीं कितीही उत्कृष्ट काम केलें तरी या घमेंडखोर लोकांनीं ‘ पोपटविद्या ’ म्हणून त्यांस नांवें ठेवण्यास कमी केलें नाहीं. कौन्सिलांतील व सुधारणेच्या बाबतींतील गोपाळरावांच्या कामगिरीस शक्य तितकें लघुत्व देण्याची यांनीं पराकाष्ठा केली. गोपाळरावांनीं सरकारशीं सहकारिता ठेवल्याबद्दल त्यांनीं गोपाळरावांस देशद्रोही ठरविलें. आपल्या दुष्कर्मांचीं फळें भोगीत असतांना गोपाळरावांवर अनन्वित आरोप केले, आपल्या शिष्यवर्गाकडून व अनुचरांकडून गोपाळरावांच्या नालस्तीचे पोवाडे ऐकण्यांत धन्यता मानली. मत्सरानें देशांतील तरुणांमध्यें वेळीं अवेळीं गोपाळरावांबद्दल बुद्धिपुरस्सर दुराग्रह उत्पन्न केला. कित्येक तरुण माथे-फिरूनीं या वेडांत गोपाळरावांचा जीव घेण्याचाही प्रयत्न केला होता. सारांश, शक्य त्या मार्गानें गोपाळरावांचा पाणउतारा करून त्यांचा तेजोभंग होईल अशी छळणूक त्यांचा पार्थिव देह ओंकारेश्वरावर जाईपर्यंत चालू होती. अशा स्थितींतही गोपाळरावांची देशभक्ति एक केंसभरही ढळली नाहीं, त्यांनीं देशोन्नतीबद्दल चालविलेले प्रयत्न किंचितही शिथिल झाले नाहींत. एका मार्मिक लेखकानें गोपाळरावांबद्दल काढलेले पुढील उद्गार किती यथार्थ आहेत हें स्पष्ट दिसून येईल.

“ But what he shared with fewer men was his superb courage in standing against his own people and bearing the brunt of their anger. His famous apology of 1897 and the way in which he faced the extreme storm are conclusive proofs of this. To oppose the Government



सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या इमारती.

[ शेजारच्या टेंकडीवरून देखावा. ]



सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या इमारती.

[ शेजारच्या टेंकडीवरून देखावा. ]

even when you are sure of the applause of your own people is hard, but to oppose your own countrymen, to have your motives misjudged by those for whom you are toiling, to become the butt of the laughter of fools and mockery of the profane, to have the foul epithet of coward and traitor hurled at yon at every turn, and still go on fighting with the Government with your right hand tied behind your back,-that is very much harder. But Mr. Gokhale did all this without flinching, though it entailed unutterable suffering on his proud and sensitive nature, and his countrymen to-day are all the more grateful to him for his having done it."

सर्व अडचणी व मानसिक त्रास सोसून देशभक्तीचें व्रत गोपाळरावांनीं आमरणान्त चालविलें. गोपाळराव गेलेच. त्यांच्या उज्ज्वल कीर्तीस त्यांच्या हितशत्रूंच्या अपकारानें यत्किंचितही कमीपणा आला नाहीं. आमची एवढीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे कीं, गोपाळरावांच्या शत्रूंस आपल्या कृत्यांचा आढावा देशापुढें इतक्या उत्कृष्टपणें मांडतां येवो. ' घटं भिंद्यात् पटं छिंद्यात् कुर्याद्वा रासभस्वनं । येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत् ॥ ' हा नेहमींचा अनुभव आहेच.

## सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी.

गोपाळरावांनीं नुसती आराध्यदेवता व तिची भक्ति एवढ्यांतच आपली इतिकर्तव्यता मानली नाहीं. मोक्षप्राप्ति होण्याकरितां पुष्कळ कर्म आचरण करावें लागतें, स्वार्थाचा संन्यास करावा लागतो; व आपल्यास सर्वस्वी वाहून घेऊन तदाकार वृत्ति व्हावी लागते. यासाठीं एक मठस्थापना गोपाळरावांनीं केली, व त्यांतील कर्ममार्गाचीही दिशा घालून दिली. संप्रदायाचे भाषेंत बोलावयाचें झाल्यास, देशाची उन्नति हेंच ध्येय, किंवा आराध्य देवता; देशभक्ति हीच उपासना; निरपेक्षपणें निरनिराळ्या चळवळींत काम करणें हेंच कर्म; संपूर्ण स्वार्थत्याग हीच दृढ भक्ति. या कर्मयोगाचे सिद्धीकरितां " सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटी " हाच मठ व या संस्थेचे सभासद होणें हाच आत्म-यज्ञ. याप्रमाणें आध्यात्मिक उन्नतीच्या परंपरेसारखी आधिभौतिक परंपराही

गोपाळरावांनीं घालून दिली. आध्यात्मिक ध्येयाकरितां पुष्कळ लोक स्वार्थत्याग करण्यास तयार होतात, संन्यासवृत्ति स्वीकारतात, असा सर्वत्र अनुभव आहे. आधिभौतिक ( Secular ) ध्येयाकरितां अशा तऱ्हेचा स्वार्थत्याग करणारे लोक कितीसे तयार होतील व ही परंपरा कितपत चिरंतन होईल याबद्दल **सर व्हॅलेंटाइन चिरोल** यांनीं आपल्या एका मार्मिक लेखांत शंका प्रदर्शित केली आहे व ती अवास्तव आहे असेंही म्हणतां येणार नाहीं. धार्मिक परंपरेमध्यें स्वार्थत्यागाची किंवा आत्मयज्ञाची जरी जरूर लागते, तरी त्यांतील प्रवर्तक हेतु स्वार्थपरायणतेचा असतो. भक्ताचें प्रेम कितीही निस्सीम असलें तरी त्यांतील अंतिम हेतु मोक्ष, सद्गति, सायुज्यता हाच असून तो व्यक्तिविषयक आत्मोन्नतीचाच होय. ह्या आधिभौतिक ध्येयामध्यें व्यक्तिविषयक उन्नतीस अवसरच नाहीं. देशाची उन्नति कधीं होईल याचा नेम नाहीं. आपण, आपलें कुटुंब, किंवा आपल्यावर अवलंबून असलेले लोक, यांस स्वराज्यसुखाचा लाभ मिळेलच असाही भरंवसा नाहीं. इतारतीच्या पायांतील दगडास ज्याप्रमाणें कोणतेंही दृश्य स्वरूप नाहीं, त्याप्रमाणें अहंकाराचा सर्वत्याग करून, व्यक्तिविषयक कोणत्याही हेतूची इच्छा न धरतां निरपेक्षपणानें देशसेवेचें व्रत अंगिकारणें हें कोणत्याही आध्यात्मिक मार्गापेक्षां निःसंशय श्रेष्ठतर असून, विशेष उदात्त आहे. अशा तऱ्हेची महनीय परंपरा स्थापन करून आपल्या उदाहरणानें तिला मूर्त स्वरूप देण्याचा गोपाळरावांनीं प्रयत्न केला आहे, व "सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी" हेंच याचें सप्रयोग उदाहरण आहे. 'सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटी' स्थापन करण्यांत गोपाळरावजींचा हा हेतु होता कीं, देशांतील परिस्थितीवरून राजकीय चळवळीचें काम अव्याहतपणें चालू ठेवावें. प्रत्येक समंजस मनुष्यास ही स्थिति अपरिहार्यच वाटेल, राजकीय चळवळीचा इतिहास पाहिला तर एकोणिसाव्या शतकांतील पहिलीं पंचवीस वर्षें स्वराज्याचा ऱ्हास व परकीय राजसत्तेची स्थापना यांत गेलीं. दुसऱ्या पंचवीस वर्षांत परकीय सर्वत्र विस्तार राजसत्तेचा झाला व तिचीं मुळें खोल गेलीं. हिंदी कर्तृत्वाचा समूळ ऱ्हास या कालांत झाला, व लोक किंकर्तव्यतामूढ होऊन गेले. येथील प्रजेच्या दृष्टीनें एकोणिसाव्या शतकांतील दुसरा पाद म्हणजे अंधारयुग ( Dark ages ) असें त्यास म्हणतां येईल. तिसऱ्या पादाच्या अव्वलींतील पिढीला ब्रिटिश राज्यसत्तेचें नवीन तेज व परवशतेमुळें देशांतील हीन व उद्वेगजनक स्थिति यांतील विरोध तीव्र भासूं

लागला. यामुळें परकीय सत्तेची थोरवी गाणारांचा वर्ग उत्पन्न झाला. इ० स० १८५७ सालीं विश्वविद्यालयाची स्थापना झाली. विश्वविद्यलयांतून ज्ञानसंपादन करून जी पिढी निर्माण झाली तिला देशांतील वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान होऊं लागलें. परवशतेचें भेसुर स्वरूप स्पष्टपणें प्रत्ययास आलें. स्वकीय हक्कांबद्दलची जागरूकता उत्पन्न झाली. वर्तमानपत्रांच्या व मासिकांच्या द्वारें, सार्वजनिक पुढाऱ्यांच्या लेखांतून व भाषणांतून, राजकीय चळवळीस प्रारंभ झाला. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटल्या पादाच्या मध्यभागीं चळवळीस मूर्त स्वरूप प्राप्त झालें. सन १८८५ सालीं “ राष्ट्रीय सभे ” ची स्थापना झाली. थोडक्याच काळांत कौन्सिलाची सुधारणा होऊन लोकपक्षाचा राजदरबारांत प्रवेश झाला. वर्तमानपत्रें, कांहीं मासिकांतील लेख, मधून मधून भरणाऱ्या प्रांतिक सभा, बजेटाच्या वेळीं कौन्सिलांत होणारी चर्चा, व वर्षांतूनतीन दिवस भरणारी “राष्ट्रीय सभा” हींच राजकीय चळवळीचीं आजपर्यंतचीं प्रधान अंगें मानलीं जात. अशा तऱ्हेनें अनियमित व अल्पकाळ चाललेल्या राजकीय चळवळीपासून कितपत उपयोग होणार ? राष्ट्रीय सभेच्या स्थापनेपासून बराच काळपर्यंत तिचें लक्ष सुराज्याकडे लागलें होतें.स्वराज्याची मागणी १९०५ सालीं गोपाळरावजींचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या राष्ट्रीय सभेंत प्रथमतः स्पष्टपणें करण्यांत आली. दरसाल तीन दिवस याप्रमाणें राष्ट्रीय सभेचा आजपर्यंतचा हिशोब केल्यास अवघें तीन महिन्यांचें सुद्धां काम होत नाहीं. या कामाच्या मानानें देशांतील झालेली राजकीय प्रगति निःसंशय उत्साहजनक आहे व सनदशीर चळवळीस नांवें ठेवण्यास यत्किंचित्‌ही कारण नाहीं. ज्या लोकांना राष्ट्रीय सभेसारख्या संस्थेचें काम जत्रेंतील बाजाराप्रमाणें तीन दिवस पुरें करून समाधान वाटतें, प्रांतिक सभेची बैठक सुद्धां दरसाल भरविण्याची ज्यांस जबाबदारी वाटत नाहीं, राष्ट्रीय सभेचें कार्यालय किंवा तिच्या कामाची परंपरा वर्षभर चालू ठेवण्याची ज्यांस आवश्यकता वाटत नाहीं, स्वार्थत्याग करून रात्रंदिवस राजकीय चळवळीचा प्रसार करण्याकरितां जोंपर्यंत देशांतील तरुण उल्हासाने पुढें येत नाहींत, तोंपर्यंत राजकीय चळवळीस दोष देणें किंवा तिचा उपहास करणें कितपत योग्य आहे ? सनदशीर मार्गाबद्दल निराशेचे उद्गार काढणारांनीं स्वतः या मार्गाबद्दल परिश्रम तरी किती केले आहेत ? कोणत्याही उपायाबद्दल मनोभावेंकरून प्रयत्न न करतां त्याच्या फोलपणाबद्दल शोक करणें अत्यंत असमंजसपणाचें आहे. स्वार्थत्यागाची कमतरता व देशभक्तीचा अभाव हे

दोन्हीही स्वतःच्या अंगचे गुण झांकण्याकरितां निराशेचा हा खोडसाळ आक्रोश आहे. आजपर्यंतचे झालेले प्रयत्न, म्हणजे एखाद्या जंगलांत भव्य इमारत बांधण्यापूर्वी ज्याप्रमाणें कांटेरी झाडें व घनदाट वृक्ष तोडून जागा साफ करावी लागते त्याप्रमाणेंच, पूर्वतयारीचे होते. या तयार झालेल्या जागेवर देशोन्नतीची भव्य इमारत उठण्यापूर्वी पायांत पुष्कळ माल भरला पाहिजे, व तो पाया मजबूद केला पाहिजे. यासाठींच स्वार्थत्याग करून, अहंकार सोडून, कोणत्याही लौकिकाची किंवा फायद्याची हांव न धरतां, केवळ कर्तव्य म्हणून देशसेवा करणाऱ्या लोकांची जरूर हल्लींच्या पिढींत येऊन ठेपली आहे. या पायाच्या कामासाठीं जितका टिकाऊ माल देशांतील लोकांतून संपादन करतां येईल त्या मानानें देशोन्नतीची इमारत चिरंतन व रमणीय होणार आहे. गोपाळरावानीं ही स्थिति लक्षांत आणून, देशांतील झालेल्या कार्याच्या व स्वार्थत्यागाच्या मानानें मिळालेली यशःप्राप्ति लक्षांत घेऊन, सनदशीर चळवळीची परंपरा कळकळीनें व उत्साहानें कायमपणें चालू ठेवण्यासाठींच **सर्व्हेंटस् ऑफ इंडिया सोसायटी** ही संस्था अस्तित्वांत आणिली.

## सोसायटीच्या कामाचें स्वरूप.

देशकार्यांत मुख्यत्वेंकरून सर्व ठिकाणीं जी अडचण दिसत आहे, ती माणसांची होय. सार्वजनिक स्वरूपाचें कोणतेंही काम करण्यास तळमळीचीं व विशिष्टकार्यास वाहिलेलीं माणसें मिळत नाहींत. यामुळें कोणत्याही चळवळीस चांगलें स्वरूप प्राप्त होत नाहीं. "सामर्थ्य आहे चळवळीचें, जो जो करील त्याचें" ही समर्थांची उक्ति सदैव प्रत्ययास येते. याचसाठीं स्वार्थत्यागाचें व्रत स्वीकारून कळकळीनें काम करणारीं माणसें उत्पन्न करावीं, राजकीय शास्त्राचें सामान्य व विशिष्ट शिक्षण त्यांस द्यावें, व प्रत्येक व्यक्तीच्या कलाप्रमाणें व मगदुराप्रमाणें देशहिताच्या निरनिराळ्या कामांकडे त्यांस लावावें, हाच ही संस्था स्थापण्यांत गोपाळरावजींचा मुख्य उद्देश होता. देशोन्नतीची गोपाळरावजींची कल्पना फार व्यापक होती. या सर्वव्यापक चळवळीस मूर्त स्वरूप येण्यास निरनिराळ्या दिशांनीं काम करण्याची आवश्यकता आहे. सोसायटीच्या कामाचें स्वरूप साधारणपणें पांच प्रकारचें गोपाळरावजींनीं ठरविलें होतें:—( १ ) दुःखनिवारण, ( २ ) समाजसेवा, ( ३ ) सहकारि-तत्वाचा प्रसार, ( ४ ) समाजशिक्षण, ( ५ ) राजकीय चळवळ.

प्लेग, दुष्काळ, जलप्रलय किंवा साळुंख्यासारखे प्रसंग, अशा वेळीं शक्य ती मदत आपल्या देशबांधवांना करण्याचा उद्योग यांचा अंतर्भाव **दुःखनिवारण** या सदरांत होतो. अशा कष्टमय प्रसंगीं पुष्कळ परोपकारी लोक द्रव्यसाह्य करण्यास तयार असतात. परंतु हें साह्य गोळा करून त्याचा उपयोग दुःखी कष्टी झालेल्या लोकांस प्रत्यक्षपणें व्हावयास खटपट करणाऱ्या मध्यस्थाची जरूरी असते. तिकडील देशांतून समाजसेवेकरितां सर्वस्वी वाहून घेतलेले लोक पुष्कळ आहेत. मिशनरी लोकांकडूनही हें काम केलें जातें. आपल्या लोकांत परोपकारबुद्धीला किंवा भूतदयेला हें व्यावहारिक उपयुक्ततेचें वळण अद्याप लागलेलें नाहीं. हें वळण लावण्याचें काम करणारी एखादी संस्था असणें अवश्य आहे. या संस्थेचें बीं एकदां रुजल्यानंतर देशांत पुष्कळ संस्था अस्तित्वांत येतील. परंतु या बाबतींत पुढाकार कोणींच घेतला नाहीं. त्याचा उपक्रम 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी'नें केला आहे.— **समाजसेवे**च्या सदराखालीं मद्यपानासारखी चळवळ, होलिकासंमेलनासारखे नैतिक उन्नतीचे प्रश्न, निकृष्ट वर्णांतील लोकांची आधिभौतिक व आध्यात्मिक उन्नति, अंत्यजांचा उद्धार, अशरणांचें रक्षण, कुंभमेळ्यासारख्या प्रसंगीं स्वयंसेवकवृत्तीनें समाजसेवा, कामकरी वर्गाची सुधारणा, स्त्रियांची उन्नति, स्त्रीशिक्षणाचा प्रसार, स्त्रियांचे ठिकाणीं असलेल्या अमोलिक गुणांचा विकास व त्यांचा लोककल्याणाच्या कामीं उपयोग,— या व अशा अनेक प्रकारच्या कामांचा यांत समावेश होतो. या समाजसेवेच्या कामास, 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी'च्या विद्यमानें मुंबई येथें अस्तित्वांत असलेल्या सोशल सर्व्हिस लीगनें, पुणें व मुंबई येथील सेवासदनांना मूर्त स्वरूप आणलें आहे. **सहकारि-तत्त्वाचा प्रसार** किती अवश्य आहे, याबद्दल विस्तार करण्याचें कारण नाहीं. ही चळवळ यशस्वी होण्यास मुख्य अडचण चिकाटीनें काम करणाऱ्या माणसांची उणीव ही आहे. ठिकठिकाणीं या विषयांत लक्ष घालणाऱ्या लोकांचा हाच अनुभव आहे. **समाजशिक्षण** या सदराखालीं प्राथमिक शिक्षण, त्याचा सर्वत्र प्रसार, देशांतील लोकांस वर्तमानपत्राच्या द्वारें, हस्त-पत्रकांच्या द्वारें व व्याख्यानाच्या द्वारें आपल्या हक्कांची जाणीव उत्पन्न करण्याचा प्रयत्न, देशांतील राजकीय चैतन्य प्रज्वलित करून त्यास तेजस्विता आणण्याची खटपट, या कामांचा समावेश होतो. **राजकीय चळवळ** या सदराखालीं प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलांत महत्वाच्या राष्ट्रहिताच्या प्रत्येक

प्रश्नासंबंधीं लोकमत जागृत करून, त्याला योग्य वळण देऊन, त्यास सजीवता आणणें व तें जोमाचें करणें याचा समावेश होतो. तसेंच **प्रांतिक** किंवा **राष्ट्रीय सभां**ची तयारी, राजकीय बाबतींत खटपट करणाऱ्या संस्थांची स्थापना, इंग्लंडसारख्या ठिकाणीं देशोन्नतीकरितां चालविलेली चळवळ, या सर्वांचा अंतर्भाव होतो. राष्ट्रीयत्वाच्या उन्नतीची ही कल्पना किती व्यापक आहे व ती किती अनेकरूप आहे, हें विचारी माणसास सांगावयास नको. देशोन्नतीचें काम नुसत्या राजकीय हक्कांच्या चळवळींतच गुरफटलेलें नसून त्याची व्याप्ति फार मोठी आहे. सर्व बाजूंनीं देशाची उन्नति झाल्याखेरीज स्वराज्याचा लाभ मिळणें ही गोष्ट अशक्य आहे. यक्षिणीच्या कांडीप्रमाणें नुसते स्वराज्याचे हक्क मिळून एकदम आत्मोन्नति होईल, हा निव्वळ भ्रम आहे. देशांत ज्ञानाचा विस्तार करून, संघटित शक्ति उत्पन्न करून, शासनसंस्थांमध्यें व राजकारणामध्यें लायक माणसांची परंपरा उत्पन्न करूनच देशोन्नति व्हावयाची आहे. यासाठीं राजकीय उन्नतीची व्याप्ति ' सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी'नें विस्तृत केली तीच सर्वांशीं ग्राह्य आहे. गोपाळरावजींच्या स्मारकाबद्दल हल्लीं सर्वत्र चळवळ चालू आहे. कित्येक पुढारी म्हणविणाऱ्या लोकांनीं या स्मारकाच्या स्वरूपाबद्दल अनेक सूचना केल्या आहेत. या सूचना करतांना ' सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी 'च्या हल्लींच्या कार्यक्रमाबद्दल अप्रत्यक्षपणें नापसंती प्रदर्शित केली आहे. हें पाहून या लोकांच्या राजकीय उन्नतीच्या कल्पनांच्या संकुचितपणाबद्दल कींव येते. देशोन्नतीचें काम राजकीय चळवळीच्या एकाच मार्गानें चालणें अशक्य आहे व अनुपयुक्त आहे. सामाजिक दुःख निवारण्याचें काम देशोन्नतीचें नव्हे असें म्हणतां येईल काय? प्लेग व दुष्काळ यांसारख्या आपत्ति, साळुंब्र्यासारखा हृदय विदारणारा प्रसंग राष्ट्रीय संकटांपैकीं नव्हे काय ? सरकारकडून जरी दुःख निवारण्याचा प्रयत्न झाला, तथापि तो पुरेसा आहे असें म्हणतां येईल काय ? अशा कळवळ्याच्या प्रसंगीं गांजलेल्या व विपद्ग्रस्त अशा आपल्या देशबांधवांना साहाय्य कोणीं करावयाचें ? देशांत या बाबतींत पुढाकार घेणाऱ्या दुसऱ्या संस्था अस्तित्वांत आहेत काय ? धर्मप्रसाराच्या बाबतींत खर्च होणाऱ्या अमोप वित्ताचा, शक्तीचा, बुद्धीचा, सामाजिक दुःख निवारण्याचे कामीं किती उपयोग होत आहे ? विधर्मी मिशनरींखेरीज दुष्काळासारख्या आपत्तींत आपल्या देशबांधवांना मदत करणारी कोणती स्वधर्मीय किंवा स्वकीय संस्था आज-

पर्यंत अस्तित्वांत होती ? अंत्यजांसारख्या टाकाऊ मानलेल्या देशबांधवांचा उद्धार करून स्वतंत्रतेच्या हक्कांस त्यांस पात्र करावयाचा उद्योग कोणीं करावयाचा ? विस्खळित झालेल्या समाजांतून—मग तो समाज स्त्रियांचा असो, पुरुषांचा असो, मागसलेल्यांचा असो किंवा अंत्यजांचा असो, श्रीमंतांचा असो अगर गरीबांचा असो—संघटित व्यवस्था ( organised life ) स्थापन करण्याची खटपट कोणीं करावयाची ? हें देशोन्नतीचेंच कार्य नव्हे काय ? मद्यपानासारखीं मनुष्यत्वाची हानि करणारीं व्यसनें, समाजांतील बीभत्स चाली, या सर्वांना आळा घालून समाजांतील चारित्र्य बनविणें हें काम देशोन्नतीच्या भागांपैकीं नव्हे काय ? राष्ट्रोन्नतीच्या बाबतींत या उद्योगाची जरूर नाहीं असें म्हणतां येईल काय ? सहकारित्वाची चळवळ देशांत पसरण्याचे प्रयत्न कोणीं करावयाचे ? यासाठीं निर्माण झालेल्या संस्था देशांत आहेत काय ? प्राथमिक शिक्षणासाठी लीग किंवा संघ स्थापन करून ही चळवळ विस्तीर्ण प्रमाणावर करणें अवश्य नाहीं काय ? व हें काम कोणीं करावयाचें ? या व अशा प्रकारच्या सर्व कामांचा अंतर्भाव ‘ सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी’नें आपल्या कार्यक्रमांत केला आहे व सोसायटीच्या उद्देशपत्रिकेंत नमूद केल्याप्रमाणेंच हें काम चालू आहे. याचा अर्थ राजकीय प्रश्नांचा खल करूं नये, असा मुळींच नव्हे. उलट या राजकीय प्रश्नांचा खल करणें हें सोसायटीचें प्रधान अंग आहे. गोपाळरावजी हयात असतांना याबद्दल मुळींच शंका नव्हती. त्यांनीं एकट्यांनीं केलेल्या राजकीय चर्चेचें महत्व, क्षेत्र व दानत हिंदुस्थानांतील सर्व राजकारणी पुरुषांनीं समवायानें केलेल्या चर्चेपेक्षांही अधिक होती. हल्लीं सोसायटींत असलेल्या लोकांपैकींही राजकीय प्रश्नाचा ऊहापोह करण्याची पात्रता असलेले लोक हें काम करीत आहेत.

## माणसांची वाण.

या बाबतींत मुख्य अडचण लायक माणसांची आहे. ‘ सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीं’त प्रवेश करण्याबरोबर राजकीय चळवळ करण्याची पात्रता अंगीं येते असें कोणी समजत असेल तर तो निवळ भ्रम आहे. सोसायटीच्या नियमाप्रमाणें तिचा सभासद होण्यास सामान्यपणें मनुष्य पदवीधर असावा लागतो. विद्येची इतकी पूर्वतयारी व संस्कार, देशहिताची

तळमळ व स्वार्थत्याग इतके गुण अंगीं असले, म्हणजे सोसायटीच्या कार्यक्रमांपैकीं पहिलीं चार कामें पुष्कळांस करतां येतील व प्रत्येक व्यक्तीच्या कर्तबगारीच्या, उत्साहाच्या व श्रमाच्या मानानें या चार कामांत यशःप्राप्ति मिळण्याचा पुष्कळ संभव आहे. परंतु सोसायटीच्या कार्यक्रमांतील पांचवें काम म्हणजे राजकीय चळवळ, हिची गोष्ट फार निराळी आहे. विश्वविद्यालयांतील अगदीं वरिष्ठ प्रतीची पदवी मिळवून जरी कोणी या संस्थेचा सभासद् झाला, तरी त्यास पुष्कळ दिवस शिष्यवृत्तीनें राहून अभ्यास केला पाहिजे. योग्य संधि मिळेपर्यंत त्यास उमेद्वारी केली पाहिजे. दुसरी गोष्ट, या चळवळींत पडणाऱ्या मनुष्याच्या अंगीं उतावीळपणा बिलकूल कामाचा नाहीं. राजकीय चळवळींत काम करणाऱ्या मनुष्याला पुष्कळ कालपर्यंत आपल्या कामगिरीचें दृश्य स्वरूप दाखवितां येणार नाहीं. कित्येक प्रसंगीं स्वतः खटपट करून यशःप्राप्ति दुसऱ्याच लोकांना मिळण्याचा संभव असतो. स्वतःच्या श्रमाचें चीज होणेंही अशक्य असतें. कांहीं वेळ आपण मागें राहून आपल्या प्रयत्नांस अदृश्य स्वरूप द्यावें लागतें. लौकिकाची किंवा प्रतिष्ठेची यत्किंचितही हाव धरून चालत नाहीं. तिसरी गोष्ट राजकीय चळवळ सद्नशीर मार्गानें करावयाची असल्यामुळें, प्रागतिक पक्षाच्या तत्त्वांबद्दल दृढ विश्वास असावा लागतो. या आत्मविश्वासाशिवाय राजकीय चळवळीचें काम करण्यास केव्हांही हुरूप येणार नाहीं. सरकारच्या कृत्यांची वेळीं अवेळीं टीका करून किंवा उपहास करून सवंग लोकप्रियता मिळविण्याचा सुलभ उपाय आहे; परंतु सनदशीर चळवळीमध्यें या मार्गाचा तादृश्य उपयोग होत नाहीं. पुष्कळ प्रसंगीं आपल्या देशबांधवांकडून अपमान, उपहास, निंदा व त्रास सोसावा लागतो. देशद्रोही म्हणवून घेण्याची पाळी येते. अपयशानें व निराशेनें मन उद्विग्न होतें, अशा स्थितींतही समतेनें, निश्चयानें, आत्मविश्वासानें व धिमेपणानें काम करण्याची कुवत अंगीं यावी लागते. या सर्व कारणांमुळें राजकीय चळवळीस वाहून घेणारीं योग्य माणसें मिळणें फार दुरापास्त आहे. या चळवळींत लौकिक संपादन करण्यास आम्हीं प्रारंभीं नमूद केलेले मुत्सद्द्याचे गुण अंगीं असावे लागतात, सुमारें पन्नास वर्षांच्या काळांत राजकीय चळवळींत अलौकिक योग्यतेस चढलेला गोपाळरावांसारखा एकच मनुष्य सर्व हिंदुस्थानांत झाला. भावी पिढींत तरी त्यांच्यासारखा दुसरा मनुष्य होईल किंवा नाहीं. याची शंकाच आहे. या सर्व गोष्टींचें मनन केलें असतां असें दिसून येईल

र्की राजकीय चळवळीचें सोसायटीचें काम नांवलौकिकास येण्यास उत्कृष्ट माणसांची आवश्यकता आहे. सोसायटी स्थापन झाल्यापासून आज दहा वर्षांत नांवाजण्यासारखीं माणसें मिळालीं नाहींत. माणसें मिळेपर्यंत वाट पाहणें हें केव्हांही शहाणपणाचें होणार नाही. याच हेतूनें मिळालेल्या माणसांच्या मगदुराप्रमाणें गोपाळरावांनीं त्यांस देशोन्नतीच्या निरनिराळ्या कामांस लावलें. सोसायटीसंबंधीं व्यंजनेनें किंवा उपरोधानें टीका करणारांनीं वरील गोष्ट लक्षांत ठेवणें अत्यंत अवश्य आहे. सोसायटीच्या स्थापनेपासून तों स्वतःच्या निधनापर्यंत देशांतील अनेक अडचणी व अनपेक्षित संकटें यांमुळें गोपाळरावजींना या दहा वर्षांच्या काळांत दहा महिनेसुद्धां सावधानपणानें सोसायटीच्या कामाकडे लक्ष देतां आलें नाहीं. सार्वजनिक कामाचा अहवाल पाहिला असतां, काम करणाऱ्या देशांतील एखाद्दुसऱ्या तळमळीच्या मनुष्यावरच कामाचा सर्व बोजा पडतो. श्रमविभागाचें तत्त्व सार्वजनिक कामांत तरी आजमित्तीस मुळींच अस्तित्वांत नाहीं. कौन्सिलांत जीवापाड श्रम करून काम करणाऱ्या मनुष्यानेंच राष्ट्रीय सभेंत पुढाकार घेतला पाहिजे, इंग्लंडांतील चळवळीस गेलें पाहिजे, आणीबाणीच्या प्रत्येक प्रसंगीं अन्यायाचा प्रतिकार करण्याकरितां धडपड केली पाहिजे व पडेल तें काम करण्यास तत्पर असलें पाहिजे, असा आजपर्यंतचा अनुभव आहे. १९०५ सालीं १२ जनला सोसायटी स्थापन करण्यांत आली. कर्झनशाहीच्या दडपशाही धोरणाबद्दल इंग्लंडांत लोकमत जागृत करण्याकरितां जाण्यासाठीं राष्ट्रीय सभेनें गोपाळरावांस हुकूम केला होता. ही कामगिरी संपते तोंच गोपाळरावजींस राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष निवडलें. १९०६ सालीं फुल्लरशाहीच्या अतिरेकामुळें त्यांनीं विलायतेस जावें, असा येथील लोकांचा फार आग्रह पडला व याच कारणामुळें त्यांस तेव्हां विलायतेस जावें लागलें. हें सालही विलायतेच्या सफरींत गेलें. १९०७ सालीं असंतोष व क्रांतिकारक चळवळीचा झपाट्यानें देशांत फैलाव होत असल्यामुळें लोकमतास आळा घालण्याकरितां ठिकठिकाणीं हिंडावें लागलें. जाहीरव्याख्यानें द्यावीं लागलीं. ही कामगिरी व कौन्सिलचें काम संभाळून या सालीं त्यांना फक्त दोन महिने सोसायटीच्या कामाकडे लक्ष देतां आलें. १९०८ सालीं कौन्सिलच्या योजनेचा प्रश्न लॉर्ड मोर्ले यांच्यापुढें असल्यामुळें, लोकपक्षाची बाजू सेक्रेटरी ऑफ स्टेट यांजपुढें मांडण्याकरितां त्यांस विलायतेस जावें लागलें. हें सर्व वर्ष याच खटपटींत गेलें. १९०९ सालीं सुधारणेच्या

योजनेस मूर्तस्वरूप देण्याचें काम चालू होतें व त्या वाटावाटींतच गोपाळ-रावांचा बहुतेक काळ गेला. १९१० सालापासून दरसाल तीन महिने कौन्सिलच्या कामासाठीं त्यांस जावें लागे. याच सालीं प्राथमिक शिक्षणाच्या चळवळीस प्रारंभ झाला. या सालीं सुमारें तीन महिने गोपाळरावजींस सोसायटींतील लोकांस स्वतःचे नजरेखालीं कांहीं शिक्षण देतां आलें. १९११ सालीं प्राथमिक शिक्षणाचें बिल पुढें येऊन तें पास होण्यासाठीं लोकमताचा पाठिंबा मिळावा म्हणून गोपाळरावजींस सतत खटपट करावी लागली. हें सर्व साल याच उद्योगांत गेलें. १९१२ सालीं कौन्सिलचें काम संपल्यानंतर दक्षिण आफ्रिकेच्या प्रश्नासंबंधानें त्यांस विलायतेस जावें लागलें. १९१२ सालच्या अखेरीस गोपाळराव दक्षिण आफ्रिकेंतून परत आले. १९१३ व १९१४ हीं दोन संपूर्ण वर्षे पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या कामांत गेलीं. ह्या दोन सालीं सोसायटींतील लोकांस शिक्षण देण्यास मुळींच फावलें नाहीं. याप्रमाणें सुमारें दहा वर्षांच्या कालांत पांच महिन्यांपेक्षां जास्त फुरसत सोसायटीच्या कामाकडे देण्यास अपरिहार्य अडचणींमुळें त्यांस अशक्य झालें. या-काळांत ज्या दुसऱ्या देशकार्यामध्यें गोपाळराव गुंतले होते, तींहीं अत्यंत महत्वाचीं होतीं असें प्रत्येक मनुष्यास कबूल करावें लागेल. या परिस्थितीचा विचार केला असता, सोसायटीच्या कामगिरीबद्दल अप्रत्यक्षपणें नापसंती दर्शविणाऱ्या लोकांस किती सबल आधार आहे, याचा प्रत्येकानें प्रांजलपणें विचार करावा अशी आमची त्यांस आग्रहाची विनंति आहे.

सोसायटीचें काम त्यांतील व्यक्तींच्या विद्वत्तेवर, उत्साहावर, कर्तबगारीवर व्यक्तिविषयक कलावर व श्रमसहिष्णुतेवर अवलंबून आहे. ज्या ज्या मानानें हे गुण विकास पावतील, त्या त्या मानानें सोसायटीची कीर्ति वाढणार आहे. परंतु सोसायटींत येणाऱ्या प्रत्येक मनुष्याचे ठिकाणीं देशाबद्दल तळमळ वाटली पाहिजे. धर्मश्रद्धेप्रमाणें देशभक्तीला उज्ज्वल स्वरूप प्राप्त झालें पाहिजे. अध्यात्मिक ध्येयाप्रमाणें हें आधिभौतिक ध्येयही पवित्र वाटलें पाहिजे. सार्वजनिक आयुष्यक्रम धर्मसंप्रदायाप्रमाणें पूज्य वाटला पाहिजे. कोणत्याही अपयशानें नाउमेद न होतां, कोणत्याही संकटास न जुमानतां, कोणत्याही मोहास बळी न पडतां, स्वार्थत्यागानें, आत्मतंत्रपणानें व दृढ विश्वासानें मातृभूमीच्या सेवेंत जीविताचें साफल्य व्हावें अशी दृढ भावना बाळगली पाहिजे. अशा श्रद्धेनें निष्काम देश—कार्य केल्यानंतर सद्गति प्राप्त होईल, अशी अंतःप्रवृत्ति झाली

पाहिजे, तरच देशाची उन्नति होईल. गोपाळरावांनीं सोसायटीच्या उद्देशपत्रिकेंत या ध्येयाचें वर्णन फार उत्कृष्ट तऱ्हेनें केलें आहे. "One essential condition of success is that a sufficient number of our countrymen must now come forward to devote themselves to the cause in the spirit in which the religious work is undertaken. Public life must be spiritualised. Love of country must so fill the heart that all else shall appear as of little moment by its side A fervent patriotism which rejoices at every opportunity of sacrifice for the motherland, a dauntless heart which refuses to be turned back from its objects by difficulty or danger, a deep faith in the purpose of Providence that nothing can shake, equipped with these the worker must start on his mission and reverently seek the joy which comes of spending oneself in the service of one's country." वरील उदात्त विचारांचें श्रवण, मनन व निदिध्यास प्रत्येक आर्यमातेच्या पुत्रानें करणें अत्यंत आवश्यक आहे.

## स्वार्थत्याग.

देशसेवेची ही उज्ज्वल कल्पना अंगीं बाणण्यास स्वार्थत्याग करून संन्यासवृत्ति स्वीकारली पाहिजे. ज्यांस हें शक्य नाहीं, त्यांनीं प्रापंचिक उदासीनता आपल्या आचरणांत धारण केली पाहिजे. निदान त्या दिशेनें प्रयत्न तरी केला पाहिजे. त्याशिवाय या आधिभौतिक ध्येयाची प्राप्ति होणें दुष्कर आहे. गोपाळरावांचें कुटुंब वारल्यानंतर ते जरी तरुण होते, तरी त्यांनीं अविवाहित राहण्याचा निश्चय केला. सोसायटी स्थापन झाल्यापासून ते आपल्या कुटुंबांतील माणसांपासून अगदीं अलग राहूं लागले. त्यांस दोन मुली आहेत व त्यांची आई नसल्यामुळें अशा स्थितींत कोणत्याही बापास मुलींचा लळा असणें अगदीं स्वाभाविक आहे. हे पाश गोपाळरावांनीं बुद्धिपुरस्सर कमी केले होते. कुटुंबांतील माणसांस ते केव्हां तरी अल्पकाळ भेटत असत. अगदीं आजारी असतांना किंवा शारीरिक त्रास होत असतांना कुटुंबांतील माणसें गोळा करून समाधान करून घेण्याचा त्यांनीं कधींही प्रयत्न केला नाहीं. देशाच्या विश्वप्रपंचांत पडल्यामुळें स्वतःच्या कुटुंबाबद्दल त्यांनीं अगदीं उदा-

सीन वृत्ति अक्षरशः ठेविली होती. गोपाळरावांच्या खासगी वर्तनाची ज्यास माहिती आहे, त्यांस या विधानाची सत्यता सहज कळणार आहे. गोपाळरावांचा कित्ता सोसायटींतील सभासद् आपल्यापुढें ठेवतील अशी आम्हांस पूर्ण आशा आहे.

ही सोसायटी अस्तित्वांत आल्यामुळें देशांतील विचारी लोकांस फार संतोष वाटला. अनिश्चित देशकार्याला व अदृश्य देशभक्तीला मूर्त स्वरूप प्राप्त झालें असें प्रत्येकास वाटलें. सर्वत्र गोपाळरावांचें अभिनंदन करण्यांत आलें. हिंदुस्थानचे माजी फडनवीस **सर गाय फ्लीट**वुड **वि**लसन यांचा व गोपाळरावांचा फार स्नेह होता. गोपाळरावांस पाहुणचारासाठी आपल्या घरीं त्यांनीं सिमल्यास बोलावलें होतें. विल्सन साहेब पुण्यास आल्यावेळीं गोपाळरावांनीं त्यांस सोसायटींत एक मेजवानी दिली व सोसायटींतील सभासदांची ओळख करून दिली. त्या वेळीं सोसायटींतील सर्व सभासदांस उद्देशून सर गाय विलसन म्हणाले कीं, ' एका गोखल्यांना तोंड देणें आम्हांस दुष्कर झालें आहे, इतके गोखले जर तयार होणार असतील तर या देशांतून आम्हांला लौकरच पाय काढिला पाहिजे ! " विल्सन साहेबांचे उद्गार जरी विनोदाचे होते, तरी ते किती अर्थपूर्ण आहेत, हें समंजस मनुष्यास सांगण्याचें कारण नाहीं. गोपाळराव हयात असेपर्यंत त्यांचे निकट स्नेही व त्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि बाळगणारे परिचित गृहस्थ यांनींच या संस्थेस सढळ हातानें मदत केली. सुमारें ३ लक्ष रुपये खर्चून सोसायटीकरितां इमारती, सभासदांना राहण्याच्या जागा, ग्रंथसंग्रह, छापखाना व वर्तमानपत्रें एवढीं साधनें गोपाळरावांनीं अस्तित्वांत आणलीं आहेत, व वरील मोठ्या लोकांच्या उदार देणग्यांवरच दरसाल सुमारें तीस हजारांचा खर्च चालला होता. कौन्सिलांतील कामांतील व पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या कामांतील प्राप्तीही गोपाळरावांनीं सोसायटीस दिली होती. गोपाळरावजींच्या असामान्य योग्यतेमुळें सोसायटीचा योगक्षेम आजपर्यंत चांगला चालला व सोसायटीच्या मदतीसाठीं सार्वजनिक रीतीनें विनंति करण्याचें कारण पडलें नव्हतें. आतां तो प्रसंग येऊन ठेपला आहे. गोपाळरावांनीं घालून दिलेल्या या लोककल्याणाच्या मार्गाबद्दल ज्यांना ज्यांना म्हणून आदर वाटत असेल, त्यांनीं या संस्थेतील लोकांस मदत करून त्यांस सांपत्तिक विवंचनेपासून अलिप्त ठवणें किती अवश्य आहे हें सांगावयास नकोच. गोपाळरावांनीं आपल्या हयातींतच सोसायटीच्या रूपानें आपलें स्मारक करून

ठेवलें आहे. त्यांच्या स्मारकास कोणतें स्वरूप द्यावें, याबद्दल वाटाघाट करण्याचें कारणच उरलेलें नाहीं. देशोन्नतीची गोपाळरावांची व्यापक कल्पना लक्षांत ठेवून ठिकठिकाणच्या स्मारक कमिट्या सोसायटीस साहाय्य करतील, अशी आम्हांस आशा आहे. ज्या संस्थेबद्दल त्यांस आमरणान्त कळकळ वाटत असे, ती संस्था चिरंतन करण्यावांचून दुसऱ्या कोणत्या उपायानें त्यांच्या पवित्र आत्म्यास शांतता वाटेल ?

येथपर्यंत गोपाळरावांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमांतील ठळक गोष्टींचा आह्मीं निर्देश केला आहे. गोपाळरावांचा स्वभाव व खाजगी वर्तन यांबद्दल थोडासा उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं. सत्यप्रियता हा गोपाळरावांच्या स्वभावांतील प्रधान गुण होता. जाणूनबुजून अवास्तव किंवा असत्य विधान त्यांनीं आजन्मांत केलें नाहीं. असत्याची त्यांस फार चीड होती. सत्यप्रियता हा शिष्टाचाराचा ( Gentlemanliness ) पाया आहे, असें ते नेहमीं सांगत. नित्याच्या व्यवहारांत अगदीं बारीक सारीक गोष्टींत सुद्धां बोलण्याप्रमाणें वागलें पाहिजे असा त्यांचा कटाक्ष होता. अमुक वेळेस भेटतों म्हणून त्यांस कळविलें, किंवा एकादें काम अमक्या वेळीं करतों असें म्हटलें व हयगयीमुळें अगर सामान्य व्यवहारांतील चालढकलीमुळें वेळेवर भेटलें नाहीं किंवा काम झालें नाहीं, तर त्यांस फार खेद वाटत असे. त्यांचा स्वभाव फार प्रेमळ होता परंतु त्याचा प्रत्यय स्वल्पपरिचयानें येत नसे. रुक्षदर्शनीं किंवा अल्पवेळ भेटणारास गोपाळरावांच्या अंतःकरणांतील कोमलपणा दिसून येत नसे. कित्येकांचा समज ते तुसडे आहेत असा होत असे. गोपाळरावांची तळमळ व कार्यव्यापृतता यांजकडे लक्ष दिलें असतां, येईल जाईल त्या मनुष्यास पाहिजे त्यावेळीं भेटण्यास किंवा शुष्क गप्पागोष्टींत वेळ खर्च करण्यास त्यांस फुरसत नव्हती. कित्येक लोकाग्रणींना वेळेची फारशी किंमत वाटत नाहीं. जबाबदारीनें विधायक कार्यक्रमाची (constructive Programme) ज्यांस आवश्यकता वाटत नाहीं, अशा पुढाऱ्यांना वेळेची अडचण कधींच येत नाहीं. चहाते व भक्त लोकांस आराध्यदेवतेच्या सान्निध काल घालविण्याची नेहमीं संवय असते. आपल्या पूज्य पुढाऱ्याचा निष्कारण वेळ आपण घेतों, हें भक्तमंडळीस मळींच कळत नाहीं. अशा सर्व भक्तमंडळीस संतुष्ट करणें, हें वेळेचा अपव्यय केल्याखेरीज शक्यच नाहीं. गोपाळरावांना वेळ इतका मुबलक मिळत नव्हता. प्राप्त झालेल्या अल्पकाळाचा उपयोग देशकार्यांत करावा व शिष्य-

च्छंदानुवर्तनाच्या वायफळ कामांत तो घालवूं नये असा त्यांचा क्रम होता. तथापि जिज्ञासेनें ज्ञानसंपादनाच्या हेतूनें व देशहिताच्या तळमळीनें, त्यांच्याकडे गेलेला प्रत्येक मनुष्य संतुष्ट होऊन परत येत असे. गोपाळरावजींशीं नित्य परिचय असलेल्या अनेक शिष्यवर्गास व इष्टमित्रांस त्यांच्याजवळ बसून जें ज्ञान वेळोवेळीं संकलित करतां आलें व त्यांच्या प्रेमळ स्वभावाचा जो सहवास घडला, तो काळ त्यांस आपल्या आयुष्यांतील अत्यंत संस्मरणीय वाटत आहे व त्यांची प्रशांत, गंभीर व प्रेमळ मूर्ति त्यांस सदैव नजरेपुढें दिसत आहे. साधेपणा हा त्यांच्या आयुष्यांतील तिसरा महत्त्वाचा गुण होता. इंग्लंडास जाईपर्यंत त्यांच्या नेहमींच्या पेहरावांत व वागण्यांत दिसून येणारी शालीनता सर्वांस महशूर आहे. इंग्लंडांत अनेक वेळ जाण्याच्या योगानें शिष्टसंमत असा अवश्य फेरफार त्यांच्या वागण्यांत झाला होता, परंतु साधेपणाची वृत्ति मात्र यत्किंचितही कमी झाली नव्हती. व्हाइसरॉय साहेबांनीं गोपाळरावांच्या अलौलिक देशसेवेबद्दल बहुमानाची पदवी K. C. I. E. दिली असतांही ती त्यांनीं घेण्याचें नाकारलें. सार्वजनिक आयुष्यक्रमांत ग्लॅडस्टन साहेबांप्रमाणेंच त्यांनीं साधेपणाचें मोठें उदाहरण घालून दिलें आहे. मानाकरितां हापापलेल्या लोकांनीं गोपाळरावांचें उदाहरण नजरेपुढें ठेवण्यासारखें आहे. कित्येक लोक असा प्रश्न करतील कीं, C I.E. हा किताब गोपाळरावांनीं कां स्वीकारला होता ? याचें उत्तर थोडक्यांत देण्यासारखें आहे. हा मान मिळविण्याचा गोपाळरावांनीं कधींच प्रयत्न केला नाहीं, कर्झन साहेबांसारखा सत्ताधारिवर्गाचा पुरस्कर्ता हिंदुस्थानांतील व्हाइसरॉयांत आजपर्यंत दुसरा कोणीही झाला नाहीं. कर्झन साहेबांची त्यांच्या तोंडासमोर निर्भीडपणानें व जोरदारपणें गोपाळरावांइतकी दुसरी कोणीही टीका केली नाहीं. गोपाळरावांस सी. आय. इ. हा किताब देऊन कर्झनसाहेबांनीं आपल्या बरोबरीच्या प्रतिस्पर्ध्याविषयीं गुणग्राहकताच व्यक्त केली. प्रतिपक्षीयांकडून अनपेक्षितपणें मिळालेला हा मान निःसंशयपणें महत्वाचा होता. कर्झनसाहेबांच्या बंगालच्या फाळणीच्या स्वैर व उद्दाम वर्तनानें सर्व देशांत असंतोष पसरला होता. क्रांतिकारक चळवळ डोकावूं लागली होती. राज्यकर्ते व त्यांचे ज्ञातिबांधव यांस प्रत्येक एतद्देशीयांबद्दल अत्यंत अविश्वास वाटूं लागला होता. अशा वेळीं अन्यायाबद्दल दाद मागितल्यास ती ऐकून घेण्याची सुद्धां मुष्कील होती. कर्झनसाहेबांच्या या बहुमानानें गोपाळराव

सरकारचे कितीही कडक टीकाकार असले, तरी ते राजद्रोही नाहींत किंवा ब्रिटिश राज्यपद्धति उलथून पाडणाऱ्या वर्गापैकीं नाहींत असा त्यांच्यावर शिक्का बसला. राज्यकर्त्यांच्या विश्वासाच्या या खुणेमुळें गोपाळरावजींस फार उपयोग झाला. १९०४ च्या राष्ट्रीय सभेनें कर्झनशाहीच्या बेमुर्वत धोरणास इंग्लंडांतील लोकमत जागृत करून आळा घालण्याकरितां गोपाळरावांस विलायतेस प्रतिनिधि म्हणून पाठविण्याचें ठरविलें. गोपाळराव १९०५ सालीं विलायतेस गेले व तेथें त्यांनीं पुष्कळ जाहीर व्याख्यानें दिलीं. या किताबाच्या योगानें, गोपाळराव हे सरकारच्या आदरास पात्र झालेले आहेत, सबब त्यांचें म्हणणें निर्विकारपणें ऐकून घ्यावें, अशी भावना तेथील जनतेमध्यें ठिकठिकाणीं दिसून आली, हिंदुस्थानांतून इंग्लंडांत राजकीय चळवळ करण्यास जाणाऱ्या मनुष्याची स्थिति वकीलाप्रमाणें असते. ब्रिटिश जनतेच्या न्यायासनासमोर हिंदुस्थानचीं गाऱ्हाणीं मांडावयाचीं असतात. न्यायकोर्टांत न्यायाधिशास जर वकिलाबद्दल अविश्वास, तिरस्कार किंवा तिटकारा वाटूं लागला, तर त्या वकिलाचें म्हणणें निःपक्षपातबुद्धीनें ऐकलें जाण्याचा संभव असत नाहीं, पक्षकाराची बाजू या योगानें कोर्टापुढें योग्य रीतीनें मांडण्यास अवसर मिळत नाहीं, व न्यायासही मदत होत नाहीं. अशा वकिलास बहुधा आपला धंदा बंद करण्याचा प्रसंग येतो. हा अनुभव अगदीं नेहमींचा आहे. यासाठीं ज्यांच्यापुढें न्याय मागावयाचा त्यांस न्याय मागणाऱ्या मनुष्याबद्दल आदर वाटला पाहिजे; निदान तिरस्कार किंवा अविश्वास तरी वाटतां कामा नये. इंग्लंडसारख्या अपरिचित श्रोतृवृंदापुढें हिंदुस्थानच्या प्रजेचें गाऱ्हाणें मांडतांना या पदवीमुळेंच शांतपणें व आदरानें गोपाळरावांची सुनावणी ऐकण्यांत आली. याच कारणासाठीं तत्कालीन परिस्थितीचा विचार करून गोपाळरावांनीं १९०४ सालीं कर्झन साहेबांच्या विनंतीवरून ही पदवी स्वीकारली होती. दहा वर्षांच्या काळानंतर हार्डिंजसारख्या थोर मुत्सद्द्यांनीं के. सी. आय. ई. ही पदवी देऊन गोपाळरावांचा गौरव केला त्या वेळीं १९०४ मधील स्थिति अस्तित्वांत नव्हती. प्रतिष्ठेपलीकडे या पदवीचा गोपाळरावांस तादृश उपयोग नव्हता. आपल्या नैसर्गिक साधेपणास या थोर पदवीनें व्यत्यय येईल यासाठीं त्यांनीं या पदवीचा साभार प्रतिकार केला. जन्मादारभ्य असलेल्या नम्रस्थितींतच आपला

आयुष्यक्रम कायम रहावा, या हेतूनें त्यांनीं हें मानाचें ओझें आपल्या शिरा-वर धारण करण्याचें नाकारलें.

## स्वभाव.

गोपाळरावांच्या अंगीं विलक्षण करारीपणा होता व तो अनेक प्रसंगीं दिसून आला होता. कौन्सिलामध्यें कर्झनसाहेबांशीं झगडतांना, जेंकिनससाहेबांशीं सामना करतांना, साउथ आफ्रिकेस जाण्याच्या वेळीं निर्भीडपणें क्रांतिकारक पक्षाविरुद्ध मोहीम चालवितांना, हा त्यांचा गुण सर्वांच्या प्रत्ययास आला आहे. अगदी शेवटीं पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या बाबतींतही त्यांनीं असाच बाणेदारपणा दाखविला. पब्लिक सर्व्हिस कमिशनचे सभासद असतांना ते सरकारी नोकर आहेत असा कांहीं कायदे-पंडितांचा सल्ला पडला. यामुळें त्यांस वरिष्ठ कायदेकौन्सिलचे सभासद होतां येत नाहीं असा एक आक्षेप कांहीं लोकांनीं काढला. या सर्वांचा कटाक्ष, रॉयल कमिशनचे सभासद या नात्यानें मिळणारें सुमारें दोन हजारांचें दरमहाचें वेतन गोपाळरावांस घेतां येत नाहीं अशा प्रकारचा होता. परंतु गोपाळरावांनीं सरकारास असें साफ कळविलें कीं, वरिष्ठ कायदेकौन्सिलचा सभासद होण्यास जर रॉयल कमिशनर या नात्यानें मिळणाऱ्या वेतनाची हरकत येत असेल, तर आपण कोणत्याही प्रकारचा मुशाहिरा न घेतां रॉयल कमिशनचें काम करण्यास तयार आहें. याप्रमाणें सुमारें दरमहा दोनपासून अडीच हजारांची प्राप्ति सोडून देण्यास केवळ आपल्या करारी स्वभावामुळेंच गोपाळराव तयार झाले. पब्लिक सर्व्हिस कमिशनवर असतांनाही त्यांच्या करारी स्वभावामुळें कमिशनमधील सत्ताधारी वर्गाच्या (Beaurocracy) अभिमान्यांचा व त्यांचा पुष्कळ वेळ खटका उडत असे. कमिशनचा साद्यंत रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर हे प्रसंग सर्वांस कळण्यासारखे आहेत. असो. गोपाळरावांच्या प्रचंड विद्वत्तेबरोबर त्यांच्या ठिकाणीं अतिशय सरळपणा (simplicity) किंवा भोळसरपणा होता. व्यवहारांतील सामान्य मनुष्यासही जे डावपेंच कळ-तात, ते त्यांच्या लक्षांत सकृद्दर्शनीं येत नसत. प्रत्येक मनुष्य आपल्या इतकाच सरळ व प्रामाणिक आहे असें समजून ते दुसऱ्याशीं वागत. जगांतील वाममार्गांत ते निसर्गतः अनभ्यस्त होते. यामुळें पैशाच्या किंवा व्यवहाराच्या बाबतींत त्यांस पुष्कळ वेळां नुकसान सोसावें लागे. निष्कपट व भिडस्त स्वभावामुळें

त्यांस पुष्कळ त्रास भोगावा लागला. कोलरिजनें एके ठिकाणीं व्यक्त केलेले उद्गार त्यांचेसंबंधीं नेहमीं निदर्शनास येतः—

"It is a fine saying of Coleridge that in men of genius the matured judgment of the man is combined with the delicacy of feeling and the susceptibility of impressions of the child and it needs but little acquaintance with biography to perceive that these last elements almost invariably entered into the composition of really great men. It is scarcely less true of the temple of genius than of the temple of Christianity that he who would enter in must become as a little child."

भिडस्तपणा, भोळसरपणा, जगांतील वस्तादगिरीचें अज्ञान, अकृत्रिम व अव्याजमनोहर स्वभाव व विशाल बुद्धिमत्ता या परस्परविरोधी गुणांचा संयोग थोर व्यक्तींत नेहमीं आढळतो; व मोठेपणाचें हें एक लक्षणच आहे, असें मानण्यास हरकत नाहीं. गोपाळरावजींच्या मनाचा मोठेपणाही अवर्णनीय होता. प्रतिपक्षी असला, तरी अन्याय झाल्यास त्याबद्दल मनोभावेंकरून प्रतिकाराकरितां प्रयत्न करणें हें गोपाळराव आपलें कर्तव्य समजत. रा० नरसिंह चिंतामण केळकर व गोपाळराव यांचा राजकीय बाबतींत मतभेद असून ते उभयतां भिन्न पक्षांचे होते. परंतु रा० केळकर यांस सरकारनें कायदे कौन्सिलचे सभासदाकरितां निष्कारणपणें अपात्र ठरविल्या वेळीं गोपाळरावांनीं या कृत्याचा जाहीर रीतीनें निषेध केला. या एकाच उदाहरणावरून गोपाळरावजींच्या मनाचा थोरपणा दिसून येतो, गोपाळरावांच्या विरुद्ध पक्षांतील लोकांस प्रतिपक्षाविषयींच्या इतक्या उदार बुद्धीचें एकही उदाहरण दाखवितां येणार नाहीं. गोपाळरावांच्या विषयीं नालस्तीचे लेख किंवा बीभत्स कवित्व ज्या पक्षांत तयार झालें, ऐकलें किंवा ऐकवलें, त्यांतील एकासही या अश्लील प्रकाराबद्दल नापसंती व्यक्त करण्याची जरूरी वाटली नाहीं किंवा इच्छा उत्पन्न झाली नाहीं. प्रतिपक्षाविषयीं याहून दुसरें अनुदारपणाचें ( uncharitable ) उदाहरण सांपडेल असें आम्हांस वाटत नाहीं.

## मनाचा थोरपणा.

दुसरी एक गोष्ट गोपाळरावांच्या मनाच्या थोरपणाची साक्ष पटवीत आहे. ना. गणेश व्यंकटेश जोशी यांचा व गोपाळरावांचा फार स्नेह होता. वेल्बी कमिशनची तयारी करतांना रावबहादुर जोशी यांच्याजवळ गोपाळराव कांहीं दिवस जाऊन राहिले होते. पेन्शन घेतल्यानंतर व सुरतेचे पक्षभेद झाल्यानंतर रावबहादुर जहाल पक्षांत सामील झाले. पक्षभेदामुळें गोपाळराव व ना० जोशी यांच्यामधील सलोखा कमी होत गेला. तथापि गोपाळरावांस रावबहादुर अत्यंत पूज्य वाटत. रा० ब० जोशी वारल्यानंतर त्यांचे राजनीतिशास्त्रावरील सर्व लेख संकलित करून छापावे व त्यांच्या विद्वत्तेचें स्मारक कायम ठेवावें, अशी कल्पना निघाली. ज्या पक्षानें रा० ब० जोशी यांस आत्मप्रतिष्ठेसाठीं जवळ केलें होतें व जिवंतपणीं जो त्यांचा जयजयकार करीत होता, त्यानें या कार्यांत मुळींच पुढाकार घेतला नाहीं. गोपाळरावांनीं स्वतःचे पैसे खर्च करून हा ग्रंथ छापण्याचें पत्करिलें व त्याप्रमाणें तो छापून प्रसिद्ध केला. रा० ब० जोशी यांच्याविषयीं आदर दाखविणाऱ्या कित्येक जहाल पुढाऱ्यांकडे या ग्रंथाची एकएक प्रत पाठविली असतां, ती विकत घेण्याचेंसुद्धां त्यांनीं साफ नाकारिलें. हा अनभव पुष्कळ प्रकारें बोधपर आहे. गोपाळरावांच्या मनाचा थोरपणा मात्र यावरून निःसंशयपणें निदर्शनास येत आहे. गोपाळरावांच्या ठिकाणीं वैय्यक्तिक आकर्षणशक्ति (Personol Magnetism) फार होती. त्यांच्या सहवासांत असलेल्या मनुष्यावर त्यांच्या विद्वत्तेची व थोरपणाची छाप पडत असे. कोणताही दुराग्रह असला तरी तो नाहींसा होई व त्यांच्याबद्दल आदर उत्पन्न होत असे. गोपाळरावांनीं 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी' स्थापन केल्यानंतर जीं बरींच माणसें त्यांना मिळालीं तीं पूर्वाश्रमीं गोपाळरावांच्या पक्षांतील नव्हतीं. निदान त्यांपैकीं पुष्कळांचा ओढा विरुद्ध पक्षाकडेच वाहत होता. तथापि गोपाळरावांच्या उदार चारित्र्याचा सहवास घडल्यानंतर गोपाळरावांची योग्यता त्यांस समजून आली व आजन्म गोपाळरावांचें अनुकरण करण्याचा त्यांनीं निर्धार केला. तसेंच ज्या थोड्या लोकांनीं गोपाळरावजींस उदार साह्य केलें, त्याचें रहस्यही वरील गुणांतच आहे. कित्येक लोकांनीं तर गोपाळरावांस कोरे चेक (Blank cheques) दिले होते, व त्यांना वाटेल तेवढी रक्कम त्यांस जरूर असल्यावेळीं मिळ

असे. निस्सीम पूज्यबुद्धीशिवाय इतका विश्वास असणें अशक्य आहे. इतकी प्रबळ श्रद्धा असण्यास त्या व्यक्तीच्या अंगांतील मोहक थोरपणा हेंच कारण होय. गोपाळरावांच्या सहवासांत आत्मोन्नतीचा प्रत्यय प्रत्येकास येत असे. ज्या पुरुषाच्या सहवासानें आत्मोन्नति झाल्यासारखी वाटते, ज्याच्या सान्निध्यानें चित्तवृत्ति उदात्त ( elevating atmosphere ) होतात, तोच थोर पुरुष होय, अशी एका ग्रंथकारानें व्याख्या केली आहे. गोपाळरावांच्या परिचयानें ह्या म्हणण्याचा प्रत्यय पदोपदीं येत असे. त्यांच्या काणत्याही मुलाखतींत नवीन कल्पना, नवीन विचार, नवीन दृष्टि, नवीन ज्ञानसंचय, याचा लाभ झाला नाहीं असा एकही प्रसंग जात नसे देशभक्ति, स्वार्थत्याग या कल्पना सर्वांसच बुद्धिग्राह्य होतात. गोपाळरावांच्या परिचयानें या शब्दांतील सचेतनता, यांतील जादू, यांतील दिव्य तेज, प्रत्येकाच्या अंतःकरणांत स्पष्टपणें प्रत्ययास आलें. कित्येक गोष्टी कळतात, पण त्या वळत नाहींत. गुरूपदिष्ट मार्गानें किंवा साक्षात्कारानें ज्ञानाचा प्रत्यय येतो असा सिद्धांत आहे. देशोन्नतीच्या या आधिभौतिक ध्येयाच्या बाबतींत व राष्ट्रीय धर्माच्या बाबतींत गोपाळरावांसारख्या उदात्त व सर्वतोपरी अधिकारसंपन्न पुरुषाच्या सहवासांतच जिवंत देशभक्ति व उज्वल स्वार्थत्याग यांचा साक्षात्कार होत असे. या विश्वाच्या नियंत्यासंबंधीं गोपाळरावांचा दृढ विश्वास होता. त्यांची धर्मश्रद्धा जुन्या पद्धतीची नसली तथापि त्यांनीं स्थापन केलेल्या संप्रदायास अनुसरून तिचें स्वरूप व्यावहारिक असे. परमेश्वराच्या कृपेनें आपण निष्काम बुद्धीनें खटपट केल्यास या देशाचा उद्धार होईल, असा त्यांचा दृढ विश्वास होता. कोणीही कांहीं शंका काढली किंवा निराशेचें स्तोम ( gospel of despair ) माजविलें, तर " हें विश्व ज्या विभूतीनें निर्माण केलें आहे तिला या विश्वाच्या योगक्षेमाबद्दल काळजी आहे, निरपेक्षपणें आपलें कर्तव्य करणें एवढी जबाबदारी आपल्यावर आहे, बाकीची पंचाईत करण्याचें कारण नाहीं. " असें ते नेहमीं म्हणत.

> He that made the world shall guide it,
> Learn to labour and to wait.

असा ते नेहमीं उपदेश करीत. गोपाळराव मोठे आशावादी (optimist) होते, व त्याचें कारणही परमेश्वरावरील त्यांची निष्ठा हेंच होय.

One adequate support
For the calamities of mortal life
Exists one only ; an assured belief
That the procession of our fate
however
Sad or disturbed is ordered by a Being
Of infinite benevolence and power.
Whose everlasting purposes embrace
All accidents converting them to good.

—*Wordsworth's Excursion*.

वरील कवीच्या उदात्त विचारांचें प्रतिबिंब गोपाळरावांच्या अंतःकरणांत उमटलेलें होतें. कितीही संकटें आलीं, कितीही निराशा वाटली, कितीही तेजोभंग झाला, तथापि आपल्या कर्तव्याबद्दल संपूर्ण आत्मविश्वास, परमेश्वराच्या हेतूबद्दल निश्चल श्रद्धा, या दोन गुणांमुळेंच आपली हिम्मत खचूं न देतां देशकार्याच्या दुस्तर कार्यांत अहर्निश उत्साहानें गोपाळराव काम करीत होते. देशाच्या परिस्थितींत अशा तऱ्हेचा हुरूप परमेश्वरावरील दृढ भक्तीशिवाय चिरंतन राहणें अशक्य आहे.

## योग्यता.

या बाबतींत हिंदुस्थानची तुलना आयर्लंडशीं करतां येईल. दोन्ही देश आजमितीस स्वतंत्र नाहींत. दोन्ही देशांतील स्थिति सारखीच विपन्न आहे. दोघांनाही ब्रिटिश राज्यछत्राखालीं स्वातंत्र्य मिळवावयाचें आहे. राजकीय चळवळीचा इतिहास पाहिला तर दोन्ही देशांतील स्थिति एकाच प्रकारची आहे. आर्यलंडची राजकीय चळवळ सव्वाशें वर्षांची जुनी आहे. हिंदुस्थानांतील चळवळ तीस वर्षांची आहे. तीव्रतेच्या व यशःप्राप्तीच्या मानानें दोहोंतील अंतर कालातिपाताचेंच आहे. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते, असें आपण नेहमीं ऐकतों. आयर्लंडचा इतिहास वाचतांना त्याची पदोपदीं हिंदुस्थानांत पुनरावृत्ति होत आहे, असा अनुभव येतो. गुप्तमंडळ्या, क्रांतिकारक चळवळ, बहिष्कार, स्वदेशी, नेमस्त व जहाल पक्ष, अडवणुकीचे मार्ग, या सर्वांची या देशांत—येथील परिस्थितीच्या मानानें—लोकमताच्या कमी अधिक तीव्रतेच्या दृष्टीनें पुनरावृत्ति घडत आहे. या अनुभवाप्रमाणें लोकनायकांच्याही

प्रतिभा आयर्लंडाप्रमाणें येथेंही निर्माण होत आहेत. ओ-कॉनेलसारखे सुरेंद्रबाबू, पार्नेलसारखे अडवणुकीचे भक्त, या देशांत अस्तित्वांत आहेत. गोपाळरावांस आयर्लंडचे ग्रॅटन म्हणतां येईल. सिडने स्मिथ यांनीं ग्रॅटन साहेबांचें चित्र फार हृदयंगमपणें काढलें आहे.

'Great men hallow a whole people and lift up all who live in their time. What Irish man does not feel proud that he has lived in the days of Gratton? Who has not turned to him for comfort from the false friends and open enemies of Ireland? Who did not remember him in the days of its burnings and wastings and murders? No Government ever dismayed him. The world could not bribe him. He thought only of Ireland, lived for no other object, dedicated to her his beautiful fancy, his elegant wit, his manly courage and the splendour of his astonishing eloquence. He was so born and so gifted that poetry, forensic skill, elegant literature and all the highest attainments of human genius were within his reach; but he thought the noblest occupation of a man was to make other men happy and free, and in that straight line he went on for fifty years without one side-look, without one yielding thought, without one motive in his heart, which he might not have made open to the view of God and man.'

वरील अवतरणांत **ग्रॅटन** व **आयर्लंड** याऐवजीं **गोखले** व **हिंदुस्थान** हे शब्द घातले असतां वरील वर्णन गोपाळरावांबद्दल किती यथार्थ लागू पडतें, हें मार्मिक वाचकांस सांगावयास नकोच.

या देशांत सार्वजनिक कामांत पडणाऱ्या पुढाऱ्यांस फार नाजुक परिस्थितींत दिवस काढावे लागतात. सरकारची तरफदारी केल्यास देशद्रोही म्हणवून घेण्यापर्यंत मजल येते. लोकपक्षाची बाजू समर्थन केल्यास सरकारची इतराजी संपादन करावी लागते. या परस्पर विरोधी स्थितींतून सरकारच्या आदरास व लोकांच्या संपूर्ण विश्वासास पात्र होणारा मनुष्य लोकोत्तर होय, या दुर्लभ पदवीस

गोपाळराव पोंचले होते. अशा असामान्य पुढाऱ्याचा लाभ या देशास जास्त काल झाला असता तर देशाचें भाग्य उदयास आलें असतें. तथापि—

‘ सृजति तावदशेषगुणाकरम् ।
पुरुषरत्नमलंकरणं भुवः ॥
तदपि तत्क्षणभंगि करोति चेत् ।
अहह कष्टमपण्डितता विधेः ॥ ’

हें परमेश्वरी सूत्र नित्याच्या अनुभवांतील आहे, कदाचित येथल्याप्रमाणें परमेश्वराच्या दरबारांतही शेलक्या माणसांची उणीव असेल व यामुळेंच उत्कृष्ट माणसांस अकालींच बोलावण्यांत येत असावें.

वर गोपाळरावांच्या जीवनवृत्तांतांतील महत्वाच्या गोष्टींचा आम्हीं त्रोटकपणें निर्देश केला आहे. गोपाळरावांच्या चरित्राचें सार सांगावयाचें झाल्यास **देशसेवा** व **स्वार्थत्याग** या दोन शब्दांत सांगतां येईल. तरुण व उत्साही पिढीनें हें रहस्य लक्षांत ठेवून गोपाळरावांच्या चरित्राचें अनुकरण केल्यास देशाचें पाऊल निःसंशय पुढें पडेल. होतकरू पिढींत या दोन गुणांची प्रेरणा परमेश्वरानें करावी अशी त्यास आमची नम्र प्रार्थना आहे.

**Mr. Justice Abdul Rahim**

before proceeding to unveil the portrait said :—

When I received the invitation, I very readily responded to it, because I consider it is especially appropriate that students should have a portrait of Mr. Gokhale in this hall. I had the great privilege of being associated with him for about two years in the work of the Public Services Commission, and I can assure you of my personal experience that the students of India had no greater and firmer friend than Mr. Gokhale (Cheers). Whatever question arose, his first thought turned towards Indian students and how it would affect the future generation of India. That is how he looked upon every important problem, whether of politics or of education, and there were hardly many men in India who had such experience of the work among students, for, as you know for a long time he was associated with the Fergusson College at Poona.

You are all familiar with the work which Mr. Gokhale did and attempted to do for this country, and you all know what a great man he was. But I may perhaps tell you something of the impressions created on me when I associated with him on the Public Services Commission. Before I met him on that Commission, I had met him very seldom and did not know him very well, but it did not take me very long to realise what a great man he was both in intellect and as regards character. We began our work by cross-examining witnesses— not a very pleasant duty when you examine men of eminent position in life, but I can assure you that, though I was myself a lawyer and had done a great deal of cross-examining in my time, when I found Mr. Gokhale cross-examining witnesses and flooring them one after another, I thought to myself· " Here is a lawyer and advocate indeed. " I specially remember one occasion when he cross-questioned a very eminent personage, high in official life, and I must admit that when he had finished with him it did not take him (witness) very long to confess that whatever he had said was misconceivd and wrong. So also when he came to the stage of discussion, I was equally impressed with his most unusualtalents. In fact, whenever he argued a question, it was most difficult for any one to reply to him. He was so precise in his facts, such a great master of every thing appertaining to the subject and so wonderfully accurate in his data that it was almost impossible to tackle all his arguments with any ease. I daresay most of you have heard him on the platform, and his gifts as orator are well known. It is unnecessary for me to dwell at length on his great intellectual gifts, and the oppinion which I formed after association with him for about two years was that he was one of the greatest men of his time whether in this country or in Europe or anywhere. (Cheers). You may perhaps recall

mind the words of Lord Curzon, and I firmly believe that he did not exaggerate, when he said that in powers of parliamentary debate there was hardly any one who surpassed him. ( Cheers ). Whatever his intellectual talents were, it seems to me that the example he has left in this country is to be measured more by his character. I am sure I have not come across another man who made the thought of his country so entirely absorb his life. Every day he was then thinking of nothing but his country. As you know, he never thought of any career for himself, and he devoted his entire time to the cause of India. Not only was he a politician in the ordinary acceptance of the term, but he lived in politics and he lived for the people of his country. I am no politician myself I had a short spell of it for about two years and that is all over now, and I do not think it will be appropriate on my part to dwell upon the political work of Mr. Gokhale. What he did perhaps is not to be measured by tangible results in the shape of statutes, but the greatest work he has done for his country is, it seems to me, to set an example which was never set before. India is a very strange land. You find here the greatest heights of intellect and character as well as the lowest types. Mr. Gokhale was one of those who had risen to the very greatest height. I do not say that he was alone even in his time. There are distinguished men who can challenge comparison with men in any part of the globe, but Mr. Gokhale was unique and set an example for generations, to come and that is in his selfless devotion to the cause of the country, and his greatest achievement to my mind is the Servants of India Society, of which he was the founder and President. (Cheers ). It is a unique society, the like of which perhaps is not to be found elsewhere. It is a Society which is intended to train a band of patriotic men to serve their country and to devote their whole lives to the benefit of their fellow-countrymen. I know Mr. Gokhale himself placed greater value on what he had done in connection with that Society than on any other achievements, of his, however great even those were. I was not present exactly at the last moments of his life, but I was with him in England when he was suffering greatly, and when most people thought he was nearing his end ; but always his thought was turned towards the Servants of India Society. One remarkable thing I also noticed in him was that however great was the physical suffering he was undergoing, it did not seem to have clouded his intellect or to have sapped his energy. I know when he was very ill in London, when he could hardly breathe the whole night, when he would lie awake and toss in bed, but in the morning, whenever he was at all capable of setting himself to work, he attended the meetings and took part in the discussion. Even there, one could see that he was speaking with great difficulty, but whatever he said was clearly said and was what had been clearly thought

out. I had actually seen him coming to the meetings with almost tottering steps. Still he sat there and took part in the discussions. As I have told you and as you all know ,he lived entirely for the work. He knew his end was fast approaching, but no one who met him ever heard him say so, nor had any one ever heard him complaining about his illness. He was as cheerful whenever friends went to see him as ever. He always talked about his work or other matters of general interest but very seldom about himself or his illness. That is a type of men which is very rare in this world, and it seems to me that his memory should live for a long time to inspire the vouths of this country. I wish that in every place where students gather, like hostels and debating societies, there should be a portrait of Mr. Gokhale, and I further wish that some talented man would come forward to write a fitting biography of the illustrious man. Such men are not born every day, and the least we can do is to treasure the memory of those men so that they may be of guidance to us in the future. His death was untimely, because after all he was in the prime of life when he died, and his death has been an irreparable loss to the whole of India, and India is very much the poorer for his death. But we must not expect that any man should last for an indefinite length of time, and we must be prepared to lose our great men, and we must make up our minds to the best of the ability of each one of us to follow in their footsteps. On an occasion like this, I do not think I ought to fail to mention that only the other day we have lost another great man Sir Pherozeshah Mehta. He was, as you know, a trusted friend and colleague of Mr. Gokhale, and Mr. Gokhale often turned to him for advice. The loss of these two men, I feel, will be felt for a long time in this country. But we must remember what the motto of the life of Mr. Gokhale was. It was never to give up hope. We must hope and live in hope, and we must strive our best in all circumstances, and I know Mr. Gokhale wished nothing better for his countrymen and especially the youths of this country, than that they should always fill their minds with hope and work on for the good of their country. I do not think I ought to detain you any longer, and I shall now unveil the portrait which we are all anxious to see. (Loud cheers.)

(This was delivered while unveiling an oil printing of the late Mr, Gokhale in the librery hall of the Victarial Hoste , Madras.)

*New India, Saturday, 13-11-15.*

# ज्ञानप्रकाश.

## पुणें व मुंबई.

| रोजचा. | | आठवड्याचा. | |
|---|---|---|---|
| वार्षिक वर्गणी | | वार्षिक वर्गणी. | |
| पुण्यांत | ४॥ रु. | पुण्यांत | १॥ रु. |
| मुंबईत | ४॥ रु. | मुंबईत | १॥ रु. |
| टपालानें | ९ रु. | टपालानें | २ रु. |
| दर अंकास पाव आणा. | | दर अंकास अर्धा आणा. | |

जाहिराती देण्यास उत्कृष्ट साधन.

या पत्रांत सामाजिक, राजकीय, शिक्षणविषयक, औद्योगिक वगैरे महत्वाच्या सर्व विषयांचें विवेचन होतें.

सामाजिक बाबींसंबंधानें ज्ञानप्रकाशाचें धोरण प्रगमनशील आहे ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. हिंदी लोकांस दिवसेंदिवस अधिकाधिक हक्क मिळत जाऊन त्यांचें एकजीवी राष्ट्र बनून अखेर त्यांस वसाहतींची शासनपद्धति प्राप्त व्हावी हें त्याचें राजकीय बाबींत ध्येय आहे. सामान्य हिंदी माणसाचा शिक्षणविषयक दर्जा हल्लींपेक्षां जास्त उच्च प्रतीचा झाल्याखेरीज हें ध्येय प्राप्त होणें कठीण आहे, अशीही त्याची समजूत आहे आणि या दृष्टीनें लोकमत सुशिक्षित करण्याचें काम ज्ञानप्रकाश आज गेलीं ६५ वर्षें करीत आहे. देशाची औद्योगिक प्रगति होऊन तिची जोड सामाजिक व राजकीय चळवळीस असणें अत्यंत अगत्याचें आहे असें ज्ञानप्रकाशाच्या चालकांचें मत आहे. या सर्वसामान्य विषयांखेरीज प्रचलित विषयांसंबंधानें भारदस्त लेख, स्फुट सूचना, ताजी बातमी, पत्रव्यवहार, कामगारांच्या नेमणुका, परदेशी राजकारण, बाजारभाव, टीका, इंग्रजी उतारे वगैरे मिळून दैनिकाच्या अंकांत अजमासें १६ कालम व साप्ताहिकांत दर आठवड्यास एकंदर ३५ कालम वाचनीय मजकूर येत असतो. साप्ताहिक ज्ञानप्रकाशाच्या वर्गणीदारांस सालअखेरीस एक अगर दोन पुस्तकें मिळून सुमारें १२ आणे किंमतीचीं पुस्तकें बक्षिस म्हणून पाठविण्यांत येतात.

# भाविकांस अमूल्य सांधि.

भगवद्भक्त गंगूकाका शिरवळकर
यांजकडील वहीबरहुकूम
ह. प. बाबूराव हरि देवडीकर, यांनीं तपासलेली
श्री

# तुकाराममहाराजांची सांप्रदायिक गाथा.

सुंदर कापडी बाइंडिंग, सोनेरी अक्षरांनीं.

## किंमत दोन रुपये.

ही गाथा सांप्रदायिक लोकांसच काय परंतु मराठी भाषेचा आस्थेनें व्यासंग करणारे सर्व सद्गृहस्थांसही फार उपयोगी पडेल अशी आशा आहे. या पुस्तकाचा टाईप ठळक आहे. टाईपाचा नमुना खालीलप्रमाणें आहे.

यातीं शूद्र वैश्य केला वेवसाव ।
आधीं तो हा देव कुळ पूज्य ॥

टाईप मोठा असल्यानें लहानांपासून वृद्धांपर्यंत सर्वांस सदर गाथा वाचण्यास सुलभ होणार आहे.

म्यानेजर आर्यभूषण प्रेस,
पुणें सिटी.

